मुंबई विद्याखात्यानें टेक्स्ट म्हणून मंजूर केलेलें

# आपलें बोलणें

## पुस्तक २ रें

[ मराठी पांचवी व इंग्रजी पहिली ह्यांकरितां ]

( सुधारून वाढविलेली आवृत्ति तिसरी )

लेखक—मोरेश्वर सखाराम मोने
( अध्यापक—'अध्यापिकाशाला,' हिंगणें, पुणें )

मॅक्मिलन् आणि कंपनी, लिमिटेड,
हॉर्नबी रोड, कोट, मुंबई

 १९३२ किंमत ४ आणे

# प्रस्तावना

## ( आवृत्ति तिसरी )



प्रो० **रामचंद्र कृष्ण लागू** एम्० ए० ( सर परशुरामभाऊ कॉलेज-पुणें ) यांच्या प्रथम-प्रोत्साहनावरून "**आपलें बोलणें**" या नांवाच्या व्याकरण-पुस्तकांपैकीं मराठी **पांचव्या इयत्ते**करितां लिहिलेलें हें **दुसरें पुस्तक** होय.

हें पुस्तक **टेक्स्ट** म्हणून मंजूर झालें असून, त्याच्या द्वितीयावृत्तीचे वेळीं रा० रा० **महादेव काशीनाथ कारखानीस**, बी० ए०; ( प्रिन्सिपल "ट्रेनिंग कॉलेज फॉर मेन," धुळें ) ह्यांच्या व्याकरण-विषयक "कन्याशिक्षकां"-तील लेखांचा व "व्याकरण कसें शिकवावें" ह्यासंबंधी त्यांच्या सूचनांचा मीं यथास्थित उपयोग करून घेतला होता; इतकेंच नव्हे, तर ह्या पुस्तका-संबंधीं प्रत्येक बारीक सारीक गोष्ट त्यांच्या व माझे मित्र रा० **गोविंद बळवंत मोकाशी**; ( शिक्षक–"ट्रेनिंग कॉलेज फॉर वुइमेन," पुणें ) ह्यांच्या नजरे-खालून घातल्याशिवाय छापिली नव्हती. त्यांनींही केवळ स्नेहाखातर हें काम केलें, ह्याबद्दल त्यांचे मनःपूर्वक आभार मानणें हाही कृत्रिमपणाच होईल; पण तो दोष पत्करून त्यांचा उल्लेख येथें करणें मला भाग आहे. त्यांच्या कृपेनेंच ह्या पुस्तकाच्या ह्या तृतीयावृत्तीचा योग आला, असें म्हटल्यास अतिशयोक्ति होईलसें वाटत नाहीं.

ह्या **तिसऱ्या आवृत्तीं**तही **प्रिन्सिपल सीताराम रामजी तावडे** ( ट्रेनिंग कॉलेज फॉर मेन–पुणें ) आणि **प्रिन्सिपल महादेव काशीनाथ कारखानीस** ( ट्रेनिंग कॉलेज फॉर मेन–धुळें ) यांच्या सल्ल्यानें (१) संकेतार्थाचीं उदाहरणें आणि (२) वाक्यपृथक्करणांतील पोटभाग यांमध्यें सुधारणा केली आहे. **प्रि० कारखानीस** यांचा तर मी उतराई आहेंच; पण **प्रि० तावडे** यांचेही त्यांच्या ह्या प्रेमळ मदतीबद्दल येथें आभार मानल्यावांचून राहवत नाहीं.

आपला नम्र,

**मोरेश्वर सखाराम मोने**

"अध्यापिकाशाला"
हिंगणें, पुणें.

# अनुक्रमणिका

# आपलें बोलणें

## पुस्तक दुसरें

[ पांचव्या इयत्तेकरितां ]

### १. आपण मागें काय शिकलों ?

#### [ क ] नामें.

**नाम, सर्वनाम, विशेषण, क्रियापद** आणि **क्रियाविशेषण-अव्यय, उभयान्वयी अव्यय, शब्दयोगी अव्यय** व **उद्गार-वाचक** किंवा **केवलप्रयोगी अव्यय,** अशा शब्दांच्या आठ जाति आतां आपल्यास चांगल्या रीतीनें माहीत झाल्या आहेत.

कोणत्याही वस्तूचें किंवा प्राण्याचे नांव दाखविणारा जो विकारी शब्द त्याला "**नाम**" म्हणतात.

नामांचे तीन प्रकार मागें आपण शोधून काढिले.

**१. विशेष नामें.**

| | |
|---|---|
| रामा, तांबू, मोत्या, गंगा, हिमालय, पुणें, इंग्लंड, सूर्य, दुर्योधन, कृष्ण, तारामती, | एकाच वस्तूला किंवा एकाच प्राण्याला लागू पडणारीं नांवें. |

### २. सामान्य नामें.

| | |
|---|---|
| मुलगा, गाय, कुत्रा, घोडा, पर्वत, शहर, देश, नदी, ग्रह, देव, राजा, राणी, | प्राण्यांच्या अगर वस्तूंच्या सबंध वर्गाला किंवा त्यांपैकीं प्रत्येकाला लागू पडणारीं नांवें. |

### ३. भाववाचक नामें.

| | |
|---|---|
| शौर्य, धैर्य, शत्रुत्व, मित्रत्व, मोठेपणा, मनुष्यपणा, लहानपणा, भलाई, धिटाई, | गुणांचीं नांवें. |

## [ख] विशेषणें.

नामाचा गुण दाखविणारा किंवा नामाविषयीं ज्यास्त माहिती सांगणारा जो विकारी शब्द त्याला "**विशेषण**" असें म्हणतात.

| | |
|---|---|
| **चांगला** कुत्रा, **लंगडा** मनुष्य, **तांबडें** फूल, **गुलाबी** पातळ, | हीं विशेषणें नाम **कसें** आहे, तें सांगणारीं आहेत. |
| **तीन** मुलगे, **पांच** रुपये, **शंभर** मनुष्यें, **दीड** शेर, | हीं विशेषणें नामानें दाखविलेले पदार्थ **किती** आहेत तें सांगणारीं म्हणजे संख्या दाखविणारीं आहेत. |

याप्रमाणें विशेषणेंही आपल्यास आतां सहज ओळखतां येतात.

   

आतांपर्यंत आपण कोणत्या गोष्टींचा विचार केला ?

**१. नाम व त्याचे सामान्य, विशेष व भाववाचक हे तीन भेद आठवून पाहिले.**

**२. विशेषण नामाबद्दल ज्यास्त माहिती देतें; विशेषणांपैकीं कांहीं गुण दाखविणारीं आणि कांहीं संख्या दाखविणारीं असतात; हेंही ध्यानांत आणिलें.**

---

## प्रश्न व गृहपाठ

१. खालील वाक्यांत **नामें** आढळतील तेवढीं लिहून आणा—

( १ ) हें जोंधळ्याचें ताट व ही गवताची काडी पहा. ( २ ) यांचीं पानें सारखींच आहेत. ( ३ ) त्यांना कांडीं व पेरें आहेत. ( ४ ) यांचा शेंडा व तुरा पहा. ( ५ ) दोहोंच्या मुळ्याही पहा. ( ६ ) गहूं, भात, जोंधळा, हीं धान्यें हजारों वर्षें लोक लावीत आले आहेत. ( ७ ) त्यांना चांगली जमीन व खत लागतें.

२. खालील वाक्यांतील **विशेषणें** सांगा—

( १ ) पंधरा, वीस, रुपये मिळवून कशीबशी गुजराण करणारीं पुष्कळ माणसें असतात. ( २ ) सहज चैनीखातर दोनशें, तीनशें, रुपये एकाच वेळीं खर्च करणारीही श्रीमंत मंडळी आढळतात. ( ३ ) माझ्या माहितीचे एक श्रीमंत गृहस्थ आहेत. ( ४ ) त्यांना रोज दोन रुपयांच्या सिगारेट लागतात.

३. खालील वाक्यांतील **विशेषनामें** व **सामान्यनामें** निरनिराळीं लिहून आणा—

( १ ) अमेरिकेंत वॉशिंग्टन नांवाचा एक थोर पुरुष होऊन गेला. ( २ ) त्याला त्याच्या बापानें एक कुऱ्हाड दिली. ( ३ ) त्यामुळें त्याला हर्ष झाला.

( ४ ) हस्तिनापुरीं धर्मराज राज्य करीत होता. ( ५ ) तेव्हां एका सावकारानें एका ब्राह्मणास एक घरटा दान दिला. ( ६ ) त्या जागेंत त्यास एक सोन्याच्या नाण्यांनीं भरलेला हांडा सांपडला.

( ७ ) मेवाड देशांत विक्रमाजित नांवाचा एक राजा होता. ( ८ ) त्याच्या मुलास पन्ना दाईनें संभाळिलें होतें.

४. खालील वाक्यांतील **भाववाचक नामें** सांगा—

( १ ) शिवाजीचे अंगीं शौर्य व औदार्य हे गुण विशेष होते. ( २ ) शत्रूशींही तो क्रूरपणानें कधीं वागला नाहीं. ( ३ ) प्रजेबद्दल त्याच्या अंतः-

करणांत मातेप्रमाणें वात्सल्य होतें. ( ४ ) मुत्सद्देगिरींत तर तो कधींही कोणास हार गेला नाहीं. ( ५ ) कल्याणच्या सुभेदाराच्या सुनेस पाहून तो म्हणाला, 'असें सौंदर्य माझ्या आईचें असतें तर मीही सुंदर झालों असतों.' ( ६ ) अशा प्रकारें त्याच्या अंगीं मोठेपणाचे सर्व गुण होते. ( ७ ) दुर्जनांशीं क्रौर्यानें वागण्यांत व सज्जनांशीं लीनतेनें वागण्यांत त्यास कांहीं वाटत नसे.

---

## २. आपण मागें काय शिकलों ?

---

### [ ग ] सर्वनामें.

सर्व नामांच्या बद्दल येणारा जो विकारी शब्द त्याला "**सर्वनाम**" असें म्हणतात.

सर्वनामांचे खालील भेद आपल्यास ठाऊक झाले आहेत.

**१. पुरुषवाचक—**

**प्रथम पुरुष** } बोलणारा आपल्याबद्दल जें सर्वनाम वापरतो तें.

| [ एकटा असल्यास ] | [ अनेक असल्यास ] |
|---|---|
| **मी** | **आम्ही, आपण** |

**द्वितीय पुरुष** } बोलणारा ज्याच्याशीं बोलतो त्याबद्दल जें सर्वनाम वापरतो तें.

| [ एक असल्यास ] | [ अनेक असल्यास ] |
|---|---|
| **तूं** | **तुम्ही, आपण** |

**तृतीय पुरुष**

बोलणारा ज्या तिसऱ्याच म्हणजे निराळ्या गोष्टीविषयीं बोलतो, त्याबद्दल जें सर्वनाम वापरतो तें.

[ एक असल्यास ] [ अनेक असल्यास ]

**तो, ती, तें** **ते, त्या, तीं**

**२. दर्शक—**

जवळचा पदार्थ दाखवावयाचा असतां बोलणारा त्याबद्दल जें सर्वनाम वापरतो तें.

[ एक असल्यास ] [ अनेक असल्यास ]

**हा, ही, हें** **हे, ह्या, हीं**

**३. संबंधी—**

पुढच्या तो, ती, तें, ह्या सर्वनामांशीं संबंध ठेवणारें जें सर्वनाम तें.

[ एक असल्यास ] [ अनेक असल्यास ]

**जो, जी, जें** **जे, ज्या, जीं**

**४. प्रश्नार्थक—**

एकाद्या गोष्टीविषयीं प्रश्न करावयाचा असल्यास त्याबद्दल जें सर्वनाम येतें तें.

[ एक असल्यास ] [ अनेक असल्यास ]

**कोण, काय** **कोण, काय**

**५. सामान्य—**

नक्की कोणाबद्दल उपयोगांत आलें आहे, तें न कळतां साधारणपणें जें सर्वनाम उपयोगांत येतें तें.

[ एक असल्यास ] [ अनेक असल्यास ]

**कोण, काय, कोणी** **कोण, काय, कोणी**

## [ घ ] क्रियापदें.

वाक्याच्या अर्थाची पूर्णता दाखविणारा जो विकारी शब्द त्याला "**क्रियापद्**" असें म्हणतात.

(१) "रामा जातो." } या वाक्यांत रामा हा कर्ता, जातो हें क्रियापद.

"मनी बसते." } या वाक्यांत मनी हा कर्ता, बसते हें क्रियापद.

"पोपट उडेल." } या वाक्यांत पोपट हा कर्ता, उडेल हें क्रियापद.

आतां खालील वाक्यें पहाः—

(२) "गाय दूध देते." } या वाक्यांत गाय हा कर्ता, दूध हें कर्म, देते हें क्रियापद.

"मुलींनीं गाणें म्हटलें." } या वाक्यांत मुलींनीं हा कर्ता, गाणें हें कर्म, म्हटलें हें क्रियापद.

"शिपायांनीं चोरास धरिलें." } या वाक्यांत शिपायांनीं हा कर्ता, चोरास हें कर्म, धरिलें हें क्रियापद.

यांतील पहिल्या तीन वाक्यांतील क्रियापदांस कर्में नाहींत; पुढच्या तीन वाक्यांतील क्रियापदांस कर्में आहेत; यावरून कांहीं क्रियापदें "**अकर्मक**" असतात व कांहीं "**सकर्मक**" असतात,

असें झालें. क्रियापदाचे हे दोन प्रकारही आपल्यास पूर्वींच माहीत झालेले आहेत.

   

**१. (१) पुरुषवाचक [ यांत प्रथमपुरुषवाचक, द्वितीयपुरुषवाचक व तृतीयपुरुषवाचक ], (२) दर्शक, (३) संबंधी, (४) प्रश्नार्थक व (५) सामान्य, हे सर्वनामाचे भेद आतां आपण विचारांत घेतले.**

**२. क्रियापद व त्याचे ( १ ) सकर्मक आणि ( २ ) अकर्मक हेही प्रकार आठवून पाहिले.**

## प्रश्न व गृहपाठ

१. गाय, घोडा, मोर, पोपट, बैल, मनी, बाळू, यांपैकीं कोणतेंही नाम असलेलें एकेक वाक्य बनवा; व दुसऱ्या वाक्यांत त्याच्याबद्दल येणारें **तृतीय-पुरुषवाचक** सर्वनाम आणून दाखवा.

२. ज्यांत नाम व त्याबद्दलचें **दर्शक** सर्वनाम येईल अशा वाक्यांच्या पांच जोड्या लिहा.

३. रामा आपली हकीकत गोविंदाला सांगत आहे, असें समजून रामाबद्दल 'मी' व गोविंदाबद्दल 'तूं' हीं सर्वनामें योजा. "रामा गोविंदाला म्हणतो"— अशी सुरुवात करा व त्याचें सात-आठ ओळींचें एक संभाषण लिहून आणा.

४. खालील ठळक अक्षरांतील सर्वनामें कोणत्या प्रकारचीं आहेत ?

( १ ) **कोणी** घ्या चंद्र, **कोणी** घ्या सूर्य. ( २ ) **कोणाला** दूध हवें, तर **कोणाला** चहा. ( ३ ) माझ्या हातांत **काय** आहे तें ओळख. ( ४ ) माझ्या हातांत **काय** आहे? ( ५ ) प्रदर्शनांत तूं **काय** पाहिलेंस?

५. खालील क्रियापदांपैकीं कोणतें **सकर्मक** व कोणतें **अकर्मक**? कां? मारितो, दिलें, खाईल, बसला, जात नाहीं, येणार होते, शिकवीन, पळेन, धाडील, गोंजारतो, उगवला, भ्याला, आणलें, हसतो.

६. वरील क्रियापदांमागें कर्ता, कर्म, हीं घालून, एकेक वाक्य बनवून दाखवा.

७. नाम व सर्वनाम आणि सर्वनाम व विशेषण यांत फरक काय?

---

# ३. आपण मागें काय शिकलों ?

आपल्याला **क्रियाविशेषण अव्यय, उभयान्वयी अव्यय, शब्दयोगी अव्यय** व **केवलप्रयोगी अव्यय**, हीं चार प्रकारचीं अव्ययें माहीत आहेत; व त्या शब्दांचें वाक्यांत काय काम असतें तेंही आपल्यास माहीत आहे. आतां कोणत्या तऱ्हेचे शब्द ह्या प्रत्येक अव्ययामध्यें असतात, तें ध्यानांत राहण्यासाठीं आपण त्यांबद्दल पुन: थोडा विचार करूं.

## [ क ] क्रियाविशेषण अव्ययें.

क्रियापदाचा कोणत्याही प्रकारचा गुण दाखविणारा जो अविकारी शब्द त्याला "**क्रियाविशेषण अव्यय**" असें म्हणतात.

तूं **येथें** बस, **तेथें** बसूं नको
**इकडे** या, **तिकडे** जाऊं नका
**दूर** सरकार, **मागें** बसा

यांतील मोठ्या अक्षरांतील शब्दांवरून काय कळत आहे ? क्रिया घडण्याचें **ठिकाण** कळत आहे, हें उघडच आहे.

**काल** मीं नाटक पाहिलें
**आज** सिनेमाला जाईन
**रोज** कां त्रास देतोस ?
**एव्हां** येऊं नको
**जेव्हां** बोलावीन, **तेव्हां** ये

यांतील मोठ्या अक्षरांतील शब्दांवरून कोणती गोष्ट कळत आहे ? क्रिया घडण्याची **वेळ** कळत आहे, हें स्पष्टच आहे.

**हळू** बोल, **पटकन** ऊठ
**लौकर** चल, **उगीच** बस
**मुद्दाम** बोलाव, **व्यर्थ** रागावलास

ह्यांतील **मोठ्या** अक्षरांतील शब्दांवरून आपल्यास क्रिया कशी होत आहे, ती **रीत** कळत आहे.

घरीं **जाऊन,** एवढा निरोप सांग
जवळ **असून,** देव दिसत नाहीं
**येतां–जातां** दुधाकडे पहा
शाळेंत **जातांना** वाटेंत खेळूं नये
त्याला **वाजत, गाजत,** आणा
गाईला **हाकलीत** न्या

ह्यांतील मोठ्या अक्षरांतील शब्दांवरून कोणती गोष्ट कळत आहे बरें ? असें दिसतें कीं, ह्यांतील मोठ्या अक्षरांतील शब्दांवरूनही क्रियेची **वेळ** व **रीत** हीं कळत आहेत.

ह्याप्रमाणें ह्या वरच्या वाक्यांतील जाड अक्षरांच्या शब्दांवरून क्रिया घडण्याचें **ठिकाण, वेळ** व **रीत** हीं कळत आहेत; ह्यामुळें हे सर्व शब्द क्रियेचा गुण दाखविणारे आहेत, हें उघडच आहे; व ते केव्हांही बदलत नाहींत, हें आपण मागें पाहिलेंच आहे; म्हणून ते "**क्रियाविशेषण अव्ययें**" आहेत. हे शब्द आपणांस सहज ओळखतां येतील.

---

## प्रश्न व गृहपाठ

१. खालील वाक्यांतील कोणते शब्द **क्रियाविशेषण अव्ययें** आहेत ? कां ?

"मुलें जवळ गेलीं. त्यांनीं नकाशा निरखून पाहिला. मुलांनीं तो कशाचा हें बरोबर सांगितलें; व 'त्यांत आपली शाळा कोठें आहे ?' असें विचारिलें.

'हे पहा येथें दोन रस्ते दिसतात. यांच्या मध्यें ही शाळा असावी.' 'ठीक बोललास रामा. आतां आपण हा नकाशा गुंडाळून ठेवूं.' असें गुरुजी म्हणाले."

२. खालील वाक्यांतील **वेळ व ठिकाण** दाखविणारीं **क्रियाविशेषण-अव्ययें** वेगळीं लिहून आणा.

"आज दसरा आहे. आपण आतां चतरशिंगीस जाऊं. तेथें आपल्याला पुष्कळ मौज पाहण्यास मिळेल. पण तेथें पाळणे कोठें असतात बरें? मी मागें जेव्हां गेलों तेव्हां पाळण्यांत बसायला सांपडलें नाहीं. जिकडे तिकडे दुकानेंच दिसत होतीं. गर्दीमुळें मला आंत जातां येईना, म्हणून मी मागें परतलों होतों."

३. खालील वाक्यांतील **रीत** दाखविणारीं **क्रियाविशेषण अव्ययें** सांगा–

"पक्षी पळत वाटोळ्या घिरट्या घालीत होते. मुलें उड्या मारीत डोंगराकडे जाऊं लागलीं. आम्हीं किती तरी वेळ हसत खिदळत मजेमध्यें घालविला. अंगरख्याचे बंद बांधीत व उपरणें सावरीत स्वारी निघाली. त्या भामट्यानें आमच्या देखत कोट पळविला."

---

# ४. आपण मागें काय शिकलों?

---

## [ ख ] उभयान्वयी अव्ययें.

दोन शब्द किंवा दोन वाक्यें यांच्या मध्यें येणारा जो अविकारी शब्द त्याला "**उभयान्वयी अव्यय**" असें म्हणतात.

| | | |
|---|---|---|
| (१) राम चालला | **व** | (२) सीताही निघाली |
| (१) गाईला चारा घाला | **आणि** | (२) तिला पाणी पाजा |
| (१) गोविंदाला बोलाव | **किंवा** | (२) तूं ये |
| (१) तुला आवडो | **अथवा** | (२) न आवडो |

(१) अभ्यास केला **परंतु** (२) उपयोग झाला नाहीं
(१) रामा म्हणाला **कीं** (२) मी आतां येत नाहीं
(१) जर भाजी हवी **तर** (२) मंडईंत कां जात नाहींस?

त्याचप्रमाणें (१) रामा **आणि** (२) गोविंदा हे भाऊ भाऊ होते. त्यांना वडिलांनीं (१) पाट्या **व** (२) पुस्तकें घेऊन दिलीं. (१) तुम्ही **आणि** (२) आम्ही मिळून हे आंबे संपवून टाकूं.

ह्या सर्व ठिकाणीं मोठ्या अक्षरांतील शब्द दोन **वाक्यांच्या** किंवा दोन **शब्दांच्या** मध्यें येऊन त्यांचा एकमेकांशीं संबंध जुळविणारे मध्यस्थ शब्द आहेत; ते कांहीं क्रियेचा गुण दाखविणारे नाहींत; आणि ते कधींही बदलत नाहींत, हें आपण मागें पाहिलेंच आहे; म्हणून ते "**उभयान्वयी अव्ययें**" आहेत. हेही शब्द आपल्यास ओळखतां येतील.

## [ग] शब्दयोगी अव्ययें.

अन्य शब्दाशीं संबंध जुळविण्यासाठीं दुसऱ्या शब्दाला जोडून येणारा जो अविकारी शब्द त्याला "**शब्दयोगी अव्यय**" असें म्हणतात.

ह्या घरा**वर** कावळे बसले आहेत
कावळ्या**पेक्षां** कोकिळा काळी असते
कोकिळा घरा**मध्यें** राहत नाहीं
घरां**जवळ** घरें बांधूं नयेत

ह्या सर्व ठिकाणीं जाड अक्षरांतील शब्द त्यांच्या मागच्या शब्दांना जोडून आलेले आहेत; व मागल्या शब्दांचा पुढल्या शब्दांशीं संबंध दाखवीत आहेत; आणि तेही कधीं सुद्धां न बदलणारे आहेत,

हें आपण मागें पाहिलेंच आहे; म्हणून ते "**शब्दयोगी अव्ययें**" आहेत. तेही आपल्यास ओळखतां येतील.

[घ] **उद्गारवाचक** अथवा **केवलप्रयोगी अव्ययें.**

केवळ मनाचा उद्गार किंवा विकार दाखविणारा जो अविकारी शब्द त्याला "**उद्गारवाचक** किंवा **केवलप्रयोगी अव्ययें**" असें म्हणतात.

**अबब !** किती हे आंबे ?

**छट् !** मी यांत सामील होणार नाहीं.

**अरेरे !** आई गेली, आतां त्यानें काय करावें ?

**इश् !** किती ही घाण ?

**वाहवा !** चांगली कुस्ती जिंकलीस !

हे शब्द मनाला एकदम वाटणारा उद्गार किंवा विकार दाखविणारे आहेत; व तेही कधीं नाम, सर्वनाम, यांप्रमाणें बदलत नाहींत, हें आपल्यास मागें माहीत झालें आहे; म्हणून ते "**उद्गारवाचक**" अथवा "**केवलप्रयोगी अव्ययें**" आहेत, हेंही उघडच आहे; व ते शब्दही आपल्यास ओळखतां येतील.

ह्याप्रमाणें चारही प्रकारचीं अव्ययें वाक्यांतील त्या शब्दांच्या उपयोगावरून आपल्यास ओळखतां येतील.

   

वर आपण कोणत्या गोष्टींचा विचार केला ?

**१. वाक्यांत येणाऱ्या चारही प्रकारच्या अव्ययांसंबंधीं आठवण करून पाहिली.**

---

## १३

### प्रश्न व गृहपाठ

१. **क्रियाविशेषण अव्ययें** काय काम करितात ?

२. **शब्दयोगी अव्ययें** काय काम करितात ?

३. **उभयान्वयी** व **शब्दयोगी अव्ययें** ह्यांत फरक काय ?

४. **केवलप्रयोगी अव्ययां**वरून कोणती गोष्ट कळते ?

५. प्रत्येक वाक्यांत एकेक प्रकारचें अव्यय योजून, चार चार वाक्यें धरून लिहून आणा.

६. खालील वाक्यांतील ठळक अक्षरांतील **अव्ययें** कोणत्या प्रकारचीं आहेत तें सांगा—

"चला, त्या गाई **आणि** म्हशी चरत आहेत, त्या आपण पाहूं. **चरतांना** त्या आपलीं डोकीं **मागें-पुढें** कां हलवितात बरें ? **कारण,** त्यांना वरील जबड्यांत दांत नसतात. गाई **व** म्हशी मागले पाय **अगोदर उचलून** उठतात. म्हैस गाई**पेक्षां** अंगानें स्थूल असते तशीच ती बळकट**ही** असते; परंतु ती **हळू** चालते. म्हशीला तळ्यांत **किंवा** डबक्यांत बसणें आवडतें. डांस चावूं नयेत **म्हणून** त्या अंगाला चिखल फासून घेतात."

७. खालील वाक्यांतील **उभयान्वयी अव्ययें** निराळीं काढा—

"एक कोल्हा होता व एका मांडवावर द्राक्षें होतीं. तीं मिळावींत म्हणून कोल्ह्यानें खूप उड्या मारिल्या; परंतु त्यास एकही द्राक्ष मिळालें नाहीं. मग तो म्हणाला, जर मला पंख असते तर बरें झालें असतें. आम्हां पशूंना अथवा माणसांना देवानें पंख कां बरें दिले नाहींत ?"

८. खालील वाक्यांतील **शब्दयोगी** व **उद्गारवाचक अव्ययें** सांगा—

"एके दिवशीं धन्याच्या भिकबाळीकडे रामाचें लक्ष गेलें; तेव्हां हातावर पाण्याची धार न पडतां भलतीकडे पडूं लागली. मग धनी त्यास म्हणाला, 'तूं एरंडाएवढा मोठा झाला असून, तुला विद्या नाहीं!' हें ऐकतांच रामानें धन्यापाशीं काशीस जाण्यासाठीं रजा मागितली. 'अरे, तूं काशीस जाऊन काय करणार ?' असें धनी म्हणाला. पुढें गुरूजवळ राहून रामानें उत्तम अध्ययन केलें; व तो रामशास्त्री झाला. शाबास! रामा, तुझी धन्य आहे."

---

# ५. लिंगें

नाम, सर्वनाम व विशेषण ह्यांना लिंग, वचन व विभक्ति हे विकार होतात, हें आपल्यास माहीतच आहे; आतां ह्यांपैकीं "**लिंग**" हा विकार होण्याची आपल्या भाषेंत कशी काय रीत आढळते, याचा विचार करूं.

[ १ ]

खालील शब्दांत लिंगासंबंधानें कोणती गोष्ट आढळून येते बरें ?

(१) [पुरुष–वर्गांतील शब्द] [स्त्री–वर्गांतील शब्द]

| पुरुष–वर्गांतील शब्द | | | स्त्री–वर्गांतील शब्द | | |
|---|---|---|---|---|---|
| घोडा | कुत्रा | | घोडी | कुत्री | |
| बकरा | मुलगा | | बकरी | मुलगी | |
| हा | तो | जो | ही | ती | जी |
| वेडा | शहाणा | | वेडी | शहाणी | |
| चांगला | | | चांगली | | |

आपल्या भाषेंत बऱ्याचशा पुल्लिंगी शब्दांचें स्त्रीलिंगी रूप वरीलप्रमाणें होतें, असें आपल्यास आढळून येतें.

(२) आतां खालील शब्द पहा—

| पुरुष–वर्गांतील शब्द | | स्त्री–वर्गांतील शब्द | |
|---|---|---|---|
| सिंह• | वाघ | सिंहीण | वाघीण |
| सोनार | सुतार | सोनारीण | सुतारीण |
| पाटील | मामलेदार | पाटलीण | मामलेदारीण |

ह्याप्रमाणेंही कांहीं पुल्लिंगी शब्दांचें स्त्रीलिंगी रूप आपल्या भाषेंत होतें; असें आपल्यास आढळून येतें. येथें वरच्या शब्दांप्रमाणें पुल्लिंगी शब्दांचें स्त्रीलिंगी रूप न होतां, निराळ्याच रीतीनें होत आहे. येथें वरच्यापेक्षां पुल्लिंगी शब्दांचीं स्त्रीलिंगी रूपें होण्याचा निराळाच प्रकार आढळत आहे.

( ३ ) आतां ह्या खालील शब्दांत पुल्लिंगी शब्दांचें स्त्रीलिंगी रूप कसें होत आहे, पहा बरें ?

| [ पुरुष–वर्गांतील शब्द ] | | [ स्त्री–वर्गांतील शब्द ] | |
|---|---|---|---|
| पुरुष | नवरा | स्त्री | बायको |
| बैल | बोकड | गाय | शेळी |
| मोर | उंट | लांडोर | सांड |

येथें पहिल्या शब्दांप्रमाणें घोडा–घोडी, बकरा–बकरी, अशीं पुल्लिंगी शब्दांचीं स्त्रीलिंगी रूपें आढळत नाहींत; किंवा सिंह–सिंहीण, वाघ–वाघीण, यांप्रमाणेंही पुल्लिंगी शब्दांचीं स्त्रीलिंगी रूपें झालेलीं आढळत नाहींत; येथें आणखी निराळ्याच रीतीनें पुल्लिंगी शब्दांचीं स्त्रीलिंगी रूपें आढळून येत आहेत.

[ २ ]

पुल्लिंगी शब्दांचीं स्त्रीलिंगी रूपें वरच्याप्रमाणेंच कां होतात ? **घोडा** ह्या पुल्लिंगी शब्दाचें **घोडी** असें स्त्रीलिंगी रूप होतें; पण **सुतार** याचें 'सुतारी' कां होत नाहीं ? **सुतारीण** असेंच कां होतें ? तसेंच **सिंह** ह्याचें **सिंहीण** असें रूप होतें; पण **कुत्रा**

ह्याचें 'कुत्रीण' असें कां होत नाहीं? याला उत्तर एवढेंच कीं, आपली तसेंच बोलण्याची रीत आहे म्हणून; ह्याशिवाय दुसरें कांहीं कारण नाहीं.

ह्याप्रमाणें केवळ आपली असेंच बोलण्याची रीत म्हणून **पुल्लिंगी** विकारी शब्दांचीं **स्त्रीलिंगी** रूपें वरच्याप्रमाणें होतात व तीं होण्याचे वरच्यासारखे तीन मुख्य प्रकार आपणांस आढळून येतात.

पुल्लिंगी शब्दांचें स्त्रीलिंगी रूप आणखी वरच्यापेक्षां निराळ्या रीतींनीं होत नसेल काय? असेल; पण त्याचा विचार पुढें करूं. वरच्यासारखीं **पुल्लिंगी** शब्दांचीं **स्त्रीलिंगी** रूपें आपल्या बोलण्यांत फार आढळतात व तीं आपल्यास सहज कळतात; एवढें खरें.

   

एवढ्या विचारावरून आपल्या भाषेंत लिंगांसंबंधानें आपल्यास कोणत्या गोष्टी आढळून आल्या?

**१. कांहीं पुल्लिंगी शब्दांचीं स्त्रीलिंगी रूपें 'घोडा याचें घोडी' ह्याप्रमाणें होतात.**

**२. कांहीं पुल्लिंगी शब्दांचीं स्त्रीलिंगी रूपें 'सिंह याचें सिंहीण' ह्याप्रमाणें होतात.**

**३. कांहीं पुल्लिंगी शब्दांचीं स्त्रीलिंगी रूपें होण्यांत वरच्यासारखा सुद्धां निश्चितपणा आढळत नाहीं; 'पुरुष याचें स्त्री' ह्याप्रमाणें त्यांचीं रूपें होतात.**

**४. बोलण्याची आपली अशीच रीत आहे, म्हणून असें होतें; याशिवाय यास दुसरें कांहीं कारण सांगतां येत नाहीं.**

---

## प्रश्न व गृहपाठ

१. **वाघ** ह्या पुल्लिंगी शब्दाचें **वाघीण** असें स्त्रीलिंगी रूप होतें, अशीं पांच उदाहरणें धरून लिहून आणा.

२. **घोडा** ह्या पुल्लिंगी शब्दाचें **घोडी** असें स्त्रीलिंगी रूप होतें, अशीं पांच उदाहरणें लिहून आणा.

३. वरच्याशिवाय निराळ्या रीतीनें पुल्लिंगी शब्दाचें स्त्रीलिंगी रूप होतें, अशीं निदान तीन उदाहरणें लिहून आणा.

४. खालील पुल्लिंगी शब्दांचीं स्त्रीलिंगी रूपें सांगाः—

कोंबडा, लांडगा, कोल्हा, मेंढा, पाडा, पोरटा, चिरटा, सुपला, लहानगा, चिमुकला, काळा, गोरा, लंगडा, असा, तसा, जसा, कसा, केवढा, कितका, तेवढा, मोठा, भला, चिमणा, काका, मामा, आजा, चुलता.

सोनार, सुतार, लोहार, तेली, कोळी, माळी, गवळी, पाटील, मामलेदार, तलाठी, मास्तर, बुरुड, परीट, बेड्रक, ठाकूर, कातकरी, भिल्ल, वाघमाऱ्या.

पुरुष, वर, बैल, बोकड, बोका, राजा, सासरा, नर, पिता, दीर, बाप, रेडा, मोर, खोंड.

---

# ६. वचनें

शब्दावरून एक प्राणी किंवा एक वस्तु यांचा बोध होत असला तर तो **एकवचनी** शब्द; आणि पुष्कळ प्राणी किंवा पुष्कळ वस्तु कळत असल्या, तर तो **अनेकवचनी** शब्द; हें आपल्यास नेहमींच्या बोलण्याच्या रीतीवरून कळण्यास कांहीं अडचण पडत नाहीं. आपण अशा कांहीं शब्दांचा विचार करूं या.

## पुल्लिंगी शब्द

| (१) [ एक असला तर ] | | | [ पुष्कळ असले तर ] | | |
|---|---|---|---|---|---|
| खांब, | वाघ, | सुतार, | खांब, | वाघ, | सुतार, |
| न्हावी, | तेली, | कोळी, | न्हावी, | तेली, | कोळी, |
| पेरू, | लाडू, | गडू, | पेरू, | लाडू, | गडू, |
| फोटो, | फोनो, | | फोटो, | फोनो, | |
| कवि, | रवि, | | कवि, | रवि, | |
| गुरु, | शत्रु | रिपु | गुरु, | शत्रु, | रिपु, |
| मूर्ख, | शूर | विद्वान् | मूर्ख, | शूर, | विद्वान्, |
| गरीब, | सरळ, | सुंदर, | गरीब, | सरळ, | सुंदर, |
| कृपाळू, | दयाळू, | मायाळू, | कृपाळू, | दयाळू, | मायाळू, |
| पापी, | लोभी, | मायावी, | पापी, | लोभी, | मायावी, |

वरील पुल्लिंगी शब्दांचीं **एकवचनी** व **अनेकवचनी** रूपें सारखींच होतात, निराळीं होत नाहींत; असें आढळून येतें. परंतु—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| बकरा, | घोडा, | आंबा, | बकरे, | घोडे, | आंबे, |
| कुत्रा, | वासा, | दिवा, | कुत्रे, | वासे, | दिवे, |
| तो, | हा, | जो, | ते, | हे, | जे, |
| चांगला, | भला, | शहाणा, | चांगले, | भले, | शहाणे, |

ह्या पुल्लिंगी शब्दांचीं **एकवचनें** व **अनेकवचनें** वरच्याप्रमाणें बदललेलीं आढळतात.

## स्त्रीलिंगी शब्द

( २ ) आतां स्त्रीलिंगी शब्दांचीं **एकवचनें** व **अनेकवचनें** कशीं आढळून येतात, तीं पाहूं:—

| [ एक असला तर ] | | | [ अनेक असले तर ] | | |
|---|---|---|---|---|---|
| बाग, | वेळ, | सून, | बागा, | वेळा, | सुना, |
| भिंत, | शाल, | ढाल, | भिंती, | शाली, | ढाली, |
| काठी, | लोटी, | पाटी, | काठ्या, | लोट्या, | पाट्या, |
| सासू, | जळू, | पिसू, | सासवा, | जळवा, | पिसवा, |
| बायको, | | | बायका, | | |
| ती, | ही, | जी, | त्या, | ह्या, | ज्या, |
| चांगली, | भली, | शहाणी, | चांगल्या, | भल्या, | शहाण्या, |

ह्या शब्दांचीं **एकवचनें** व **अनेकवचनें** बदललेलीं आहेत; एकसारखींच नाहींत. परंतु—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| मति, | बुद्धि, | धेनु, | मति, | बुद्धि, | धेनु, |

ह्या स्त्रीलिंगी शब्दांचीं **एकवचनें** व **अनेकवचनें** बदललेलीं आढळत नाहींत; एकसारखींच आढळून येतात.

ह्याप्रमाणें स्त्रीलिंगी शब्दांचीं **एकवचनें** व **अनेकवचनें** आपल्या भाषेंत होतात.

## नपुंसकलिंगी शब्द

( ३ )

| [ एक असला तर ] | | | [ अनेक असले तर ] | | |
|---|---|---|---|---|---|
| नांव, | गांव, | घर, | नांवें, | गांवें, | घरें, |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| केळें, | रताळें, | वांगें, | केळीं, | रताळीं, | वांगीं, |
| गुरूं, | वासरूं, | पांखरूं, | गुरें, | वासरें, | पांखरें, |
| तें, | हें, | जें, | तीं, | हीं, | जीं, |
| चांगलें, | भलें, | शहाणें, | चांगलीं, | भलीं, | शहाणीं, |

ह्याप्रमाणें नपुंसकलिंगी शब्दांचीं **एकवचनें** व **अनेकवचनें** आपल्या भाषेंत आढळतात.

असेंच कां होतें ? आपली तसें बोलण्याची रीत म्हणून होतें; ह्यापलीकडे आपल्यास त्याचें कांहीं कारण सांगतां येत नाहीं; हें आपण मागें पाहिलेंच आहे.

आपल्यास वचनांच्या संबंधानें वरील गोष्टी कळण्यास कांहीं अडचण पडत नाहीं. कोणत्याही विकारी शब्दाचें **एकवचन** किंवा **अनेकवचन** आपल्यास आपली बोलण्याची रीत माहीत असल्यामुळें सहज करितां येईल व सांगतां येईल.

   

एवढ्या विचारावरून आज आपण काय पाहिलें ?

**१. आपल्या भाषेंत पुल्लिंगी, स्त्रीलिंगी व नपुंसकलिंगी शब्दांचीं एकवचनें व अनेकवचनें कशीं होतात, तें पाहिलें.**

---

## प्रश्न व गृहपाठ

१. खालील शब्दांपैकीं ज्यांचें **एकवचन** असेल त्यांचें **अनेकवचन** व ज्यांचें **अनेकवचन** असेल त्यांचें **एकवचन** लिहून आणाः—

खिळा, खुंटी, धोतर, रानें, ससे, चिमण्या, पोपट, मैना, कावळे, घुबड, भिंत, माळिणी, चांफा, विद्यालय, शाळा, राघू, बुद्धि, वाट्या, रीति, चूल,

आंबे, रस्ते, राजा, देव, मनुष्य, अग्नि, शक्ति, पक्षी, माळ, शीळ, जीभ, खारीक, गुंज, भाषा, शाळा, विटा, कणका, गारा, शिंपा, नणंदा, जावा, सुना, चिंचा, सोंडा, विजा, तोफा, भिंती, बोरी, बाभळी, शिताफळी, केळी, आगी, राशी, जाती, मुठी, वेली, भाकरी, पोकळी, देवी, बेडकी, बी, स्त्री, ऊ, दारू, टाळू, बाजू, काकू, खड्डू, माऊ, गेरू, दारें, पानें, वस्त्रें, सूप, लेंकरूं, वासरूं, गुरूं, लिंबें, तट्टें, पांखरें, तळीं, घोसाळीं, आंधळ्या, लंगडें, लुच्चा, पांढरें, चिमुकलें.

---

## ७. सामान्यरूप

[ १ ]

विकारी शब्दांच्या लिंगांसंबंधानें व वचनांसंबंधानें आपण मागील दोन पाठांत विचार केला; आतां विभक्तींच्या संबंधानें विचार करूं.

खालील ठिकाणीं कोणती गोष्ट आढळून येते बरें ?

**राम** दशरथाचा मुलगा होता.

( राम + स ) **रामा**–स कैकेयीनें वनवासास पाठविलें.

( राम + नें ) **रामा**–नें वनवास पत्करिला.

( राम + ला ) **रामा**–ला तो पत्करावा लागला.

( राम + हून ) **रामा**–हून भरत लहान होता.

( राम + चा ) **रामा**–चा तो भाऊच होता.

**रामा,** तुझ्यावांचून मला कोणी प्रिय नाहीं.

ह्या प्रत्येक ठिकाणीं ‘राम’ हा मूळ शब्द आहे; पण त्याला प्रथमेशिवाय इतर विभक्तींचीं अक्षरें लागतांना तो जशाचा तसाच

राहिलेला आहे काय ? तो जशाचा तसाच राहिलेला आपल्यास दिसत नाहीं; **राम** ह्याचें "**रामा**" असें रूप होऊन, मग त्याला विभक्तींचीं अक्षरें लागलीं आहेत. प्रथमेशिवाय सगळ्या ठिकाणीं **राम** ह्याचें "**रामा**" असेंच साधारण रूप आपल्यास दिसून येत आहे.

आतां खालील ठिकाणीं आपण कोणत्याही विभक्तीचे प्रत्यय निरनिराळ्या शब्दांस लावून पाहूं; तेथेंही काय होत आहे पहा :—

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ' घर ' याचें | **घरा**-स, | **घरा**-नें, | **घरा**-चा, | असें होतें. |
| ' गाय ' याचें | **गाई**-स, | **गाई**-चें, | **गाई**-हून, | असें होतें |
| ' गुरु ' याचें | **गुरू**-स, | **गुरू**-चा, | **गुरूं**-त, | असें होतें |
| ' घोडा ' याचें | **घोड्या**-ला, | **घोड्या**-शीं, | **घोड्या,** | असें होतें. |
| ' सून ' याचें | **सुने**-स, | **सुने**-हून, | **सुने**-ची, | असें होतें. |
| ' लाडू ' याचें | **लाडवा**-ला, | **लाडवा**-नें, | **लाडवां**-त | असें होतें. |
| ' तो ' याचें | **त्या**-स, | **त्या**-नें | **त्यां**त, | असें होतें. |
| 'चांगला' याचें | **चांगल्या**-स, | **चांगल्या**-हून, | **चांगल्यां**त, | असें होतें. |

ह्या प्रत्येक ठिकाणीं घर, गाय, गुरु, घोडा, सून, लाडू, तो व चांगला, हे मूळ शब्द जसेच्या तसेच राहिले आहेत काय ? ते जसेच्या तसे राहिले नाहींत; तर 'घर' याचें **घरा,** 'गाय' याचें **गाई,** 'गुरु' याचें **गुरू,** 'घोडा' याचें **घोड्या,** 'सून' याचें **सुने,** 'लाडू' याचें **लाडवा,** 'तो' याचें **त्या,** 'चांगला' याचें **चांगल्या,** असें एकसारखेंच रूप द्वितीयेपासून संबोधनापर्यंतच्या सर्व विभक्तींत झालेलें आपल्यास आढळून येत आहे.

[ २ ]

आतां खालील ठिकाणीं काय होत आहे पहा बरें ?

| | | | |
|---|---|---|---|
| ( घर + वर ) | **घरा**वर | ( घर + खालीं ) | **घरा**खालीं |
| ( गाय + करितां ) | **गाई**करितां | ( गाय + साठीं ) | **गाई**साठीं |
| ( गुरु + पाशीं ) | **गुरू**पाशीं | ( गुरु + पुढें ) | **गुरू**पुढें |
| ( घोडा + मागें ) | **घोड्या**मागें | ( घोडा + मध्यें ) | **घोड्या**मध्यें |
| ( सून + बरोबर ) | **सुने**बरोबर | ( सून + पासून ) | **सुने**पासून |

येथेंही वरच्याप्रमाणेंच प्रथमेशिवाय इतर विभक्तींचीं अक्षरें लागण्यापूर्वीं जसें सर्वांना साधारण किंवा **सामान्य** असें रूप झालेलें आहे, तसेंच रूप शब्दयोगी अव्ययें लागण्यापूर्वींही झालेलें आढळून येत आहे; म्हणून अशा प्रथमेशिवाय सर्व विभक्तींच्या वेळीं व शब्दयोगी अव्यय लागण्यापूर्वीं, नामाच्या होणाऱ्या साधारण रूपाला आपण "**सामान्यरूप**" असें म्हणूं या.



आज आपणांस कोणत्या गोष्टी कळून आल्या ?

**१. नाम, सर्वनाम व विशेषण ह्यांचें प्रथमेशिवाय इतर विभक्तिप्रत्यय लागण्यापूर्वीं "सामान्यरूप" होतें, हें कळलें.**

**२. त्यांस शब्दयोगी अव्यय लागण्यापूर्वींही त्यांचें तसेंच "सामान्यरूप" होतें, हें ध्यानांत आलें.**

## प्रश्न व गृहपाठ

१. "**सामान्यरूप**" म्हणजे काय ? तें केव्हां केव्हां होतें ?

२. कागद, दौत, लेखणी, भला, पुरुष, विद्या, वीट, ग्रंथ, कोळी, शत्रु, युक्ति, ह्यांस कोणतेही विभक्तिप्रत्यय लावून त्यांचें **सामान्यरूप** करून दाखवा.

३. कोणत्याहि पांच नामांस शब्दयोगी अव्यय लावून त्यांचें **सामान्यरूप** घरून लिहून आणा.

# ८. सर्वनामांच्या विभक्ति – १

[ १ ]

विभक्तींचे प्रत्यय आपल्यास माहीत आहेत व ते नाम, सर्वनाम व विशेषण ह्यांना लागतात; हेंही आपण मागें पाहिलेंच आहे. आतां तेच प्रत्यय सर्व शब्दांना लागतात, किंवा कांहीं शब्दांना कांहीं विभक्तींकरितां निराळेच प्रत्यय लागतात; ह्याचा विचार करूं.

खालील उदाहरणें पहाः—

(१) **माझा** नवा कोट आहे
**तुझें** नवें धोतर आहे

ह्यांतील 'माझा' ह्या शब्दांत मूळ शब्द **मी** व 'तुझा' ह्या शब्दांत मूळ शब्द **तूं.**

**मी** व **तूं** ह्यांना येथें कोणते प्रत्यय लागलेले दिसत आहेत व ते कोणत्या विभक्तीचे आहेत बरें? आपल्यास एकाद्या विभक्तींत असले प्रत्यय लागलेले पूर्वीं कोठें आढळले आहेत काय? आपल्याला माहीत आहेत त्या विभक्ति-प्रत्ययांपैकीं हे प्रत्यय आहेत काय?

तिनें नवी साडी घेतली
(२) **मीं** नवी साडी घेतली

येथें 'तिनें' ह्याप्रमाणें **मी** ह्या मूळ शब्दाचें "**मी–नें**" झालें आहे का? कां होत नाहीं?

ज्याचें काम त्यानें करावें
(३) मी **आपलें** करीन

येथें आपलें ह्यांत मूळ शब्द कोणता? 'त्याचें' काम ह्याच्याप्रमाणें "**आपणचें**" काम असें व्हायला काय हरकत आहे बरें?

वरच्या शब्दांवरून असें दिसतें कीं, **मी, तूं** व **आपण,** ह्या कांहीं शब्दांना विभक्तींचे प्रत्यय कोठें कोठें निरनिराळे लागत असावेत.

[ २ ]

या वरील शब्दांचीं सर्व विभक्तींचीं रूपें काय होतात, तीं आपण पाहूं या.

**मी**

| [ ए० व० ] | [ अ० व० ] |
|---|---|
| प्र०—मी | आम्ही |
| द्वि०—मला, मजला, मातें | आम्हांस, आम्हांला, आम्हांतें |
| तृ०—मीं, म्यां, मशीं, मजशीं | आम्हीं, आम्हांशीं, आमच्यांशीं |
| च०—मला, मजला, मातें | आम्हांस, आम्हांला, आम्हांतें |
| पं०—मजहून, माझ्याहून | आम्हांहून, आमच्यांहून |
| ष०—माझा, माझी, माझें | आमचा, आमची, आमचें |
| स०—माझ्यांत | आम्हांत, आमच्यांत |

**तूं**

| [ ए० व० ] | [ अ० व० ] |
|---|---|
| प्र०—तूं | तुम्ही |
| द्वि०—तुला, तुजला, तूंतें | तुम्हांस, तुम्हांला, तुम्हांतें |
| तृ०—तूं, त्वां, तुशीं, तुजशीं | तुम्हीं, तुम्हांशीं, तुमच्यांशीं |
| च०—तुला, तुजला, तूंतें | तुम्हांस, तुम्हांला, तुम्हांतें |
| पं०—तुजहून, तुझ्याहून | तुम्हांहून, तुमच्यांहून |
| ष०—तुझा, तुझी, तुझें | तुमचा, तुमची, तुमचें |
| स०—तुझ्यांत | तुम्हांत, तुमच्यांत |

ह्याप्रमाणें **मी** व **तूं** ह्या शब्दांचीं विभक्तींचीं रूपें होतात. सर्व-नामांचीं संबोधनाचीं रूपें मात्र होत नाहींत.

---

# ९. सर्वनामांच्या विभक्ति–२

[ १ ]

आतां 'मी' व 'तूं' ह्यांच्याप्रमाणेंच **आपण** व **कोण** ह्या सर्व-नामांचींही कांहीं विभक्तिरूपें आपणांस माहीत असलेले प्रत्यय लागून होत नाहींत; तीं ध्यानांतच ठेवावयास हवींत; म्हणून तेव-ढींच रूपें येथें दिलीं आहेत. बाकीच्या विभक्तींचीं रूपें सरळच आपल्यास माहीत असलेले प्रत्यय लागून होतात; म्हणून तीं येथें दिलीं नाहींत.

**आपण**

तृतीया—आपण

षष्ठी—आपला, आपली, आपलें

**कोण**

तृतीया—कोण, कोणीं,

**काय**

| | |
|---|---|
| प्रथमा—काय | पंचमी—कशाहून |
| द्वितीया—कशास, कशाला, | षष्ठी—कशाचा, कशाची, कशाचें |
| तृतीया—कशानें, कशाशीं, | सप्तमी—कशांत |
| चतुर्थी—कशास, कशाला, | |

ह्याप्रमाणें **काय** ह्या शब्दाच्या उपयोगाकरितां 'कसा' ह्या शब्दाचीं विभक्तिरूपेंच उपयोगांत येतात.

अशा रीतीनें वरील सर्वनामांचीं आपल्यास माहीत असलेले प्रत्यय लागूनच कांहीं विभक्तींचीं रूपें होत नाहींत, निराळ्याच रीतीनें होतात; म्हणून त्यांचा आपणांस येथें स्वतंत्र विचार करावा लागला. बाकीच्या **हा, तो, जो,** ह्या सर्वनामांच्या विभक्तींच्या रूपांत कांहीं भानगड नाहीं.

[ २ ]

आतां मागील पाठांतील **मी, तूं** व **आपण** ह्यांच्या प्रथमा व तृतीया ह्या विभक्तींचीं रूपें साधारणतः सारखींच दिसत आहेत; तेव्हां त्यांची प्रथमा व तृतीया कशी ओळखावी, ही अडचण वाटणें साहजिक आहे; तर येथें एवढेंच ध्यानांत ठेवावें कीं, मी, तूं व आपण ह्यांच्या ठिकाणीं रामानें, मनीनें असा तृतीया विभक्तीचा शब्द घालून वाक्यांतील पुढील शब्द न बदलतां वाक्य नीट जुळतें कीं नाहीं तें पहावें. नीट जुळल्यास तृतीया समजावी; नाहीं तर प्रथमा समजावी.

"**मी** जातों" येथें 'रामानें' जातों असें होत नाहीं, म्हणून येथें **मी** ह्या शब्दाची तृतीया नाहीं, **प्रथमा** आहे.

"**मीं** काम केलें" येथें 'रामानें' काम केलें असें वाक्य जमतें; म्हणून येथें **मी** या शब्दाची **तृतीया** विभक्ति आहे; प्रथमा नाहीं. त्याचप्रमाणें—

| प्रथमा | तृतीया |
|---|---|
| **तूं** पुस्तक फाडितोस | **तूं** पुस्तक फाडिलेंस |
| **तुम्ही** मजकडे या | **तुम्हीं** मजकडे यावें |
| **आपण** पुस्तक वाचितां | **आपण** पुस्तक वाचिलें काय ? |

   

आज आपण कोणत्या गोष्टींचा विचार केला ?

**१. मी, तूं, आपण, कोण व काय, ह्या सर्वनामांचीं विभक्तींचीं रूपें कशीं होतात, तें पाहिलें.**

---

## प्रश्न व गृहपाठ

१. मी, आम्हीं; तूं, तुम्हीं; कोण व आपण; ह्या शब्दांचीं तृतीया विभक्तीचीं रूपें वाक्यांत योजून तीं वाक्यें घरून लिहून आणा.

२. वरील शब्दांचींच षष्ठीचीं रूपें वाक्यांत योजून तीं वाक्यें घरून लिहून आणा.

३. **काय** ह्या सर्वनामासंबंधानें कोणती गोष्ट ध्यानांत ठेवावयास पाहिजे ?

४. खालील सर्वनामांच्या विभक्ति ओळखाः—

(१) **तूं** मध्यें मध्यें बोलूं नये. (२) **आम्ही** सातान्यास जाणार आहोंत. (३) **आपण आपली** वस्तु जपून ठेवावी. (४) ह्या झाडाची साल **कोणीं** तासली ? (५) **मीं** पाणी सांडिलें. (६) असेंच ना **तूं** म्हणतोस ? (७) **माझा** अंगरखा फाटला. (८) तो **मी** शिवीन. (९) **कोणी** घ्या ससा. (१०) **कोणी घ्या** कुत्रा. (११) **तुम्हीं काय** घेतलें ?

---

# १०. विभक्तींचें कार्य–१

[ १ ]

" **राम** दशरथाचा मुलगा होता " ह्या वाक्यांत **राम** हा मूळ शब्द तसाच राहून वाक्याचा अर्थ जमतो; परंतु " **रामास** कैकेयीनें वनास पाठविलें " ह्याऐवजीं ' **राम** कैकेयीनें वनास पाठविलें ' असें म्हणून चालत नाहीं. ' रामास ' असेंच ' राम ' ह्या शब्दाचें विभक्तीचें रूप व्हावें लागतें; म्हणजे त्याचा पुढल्या शब्दाशीं योग्य संबंध जुळतो व हवा तोच अर्थ कळतो. त्याचप्रमाणें " भरत **रामाचा** भाऊ होता " ह्या वाक्यांत ' भरत **राम** भाऊ होता ' असें म्हटल्यास हवा तो अर्थ कळत नाहीं; तसें म्हटल्यानें भलताच अर्थ उत्पन्न होतो. त्या ठिकाणीं ' राम ' ह्या शब्दाऐवजीं ' रामाचा ' असेंच विभक्तीचें रूप घालावें लागतें.

ह्यावरून नामाचा दुसऱ्या शब्दाशीं संबंध जोडण्याचें काम ह्या विभक्ति करितात; हें आपल्यास मागेंच माहीत झालें आहे. त्या कोणत्या शब्दांशीं व कोणत्या प्रकारचा संबंध जोडितात बरें? आपण ह्याचा आतां ज्यास्त विचार करूं.

[ २ ]

१. **" बाबा ताईला बैलगाडीनें साताऱ्याहून घरीं आणतील. "**

ह्या वाक्यांत—

**बाबा**—हा शब्द आणणारे कोण हें सांगत आहे. म्हणजे आणतील ह्या क्रियापदाचा बाबा हा शब्द **कर्ता** आहे; व त्याची

येथें प्रथमा विभक्ति आहे. या विभक्तीनें त्याचा ' आणतील ' या **क्रियापदाशीं** संबंध जुळला आहे.

**ताईला**—हा शब्द आणण्याची क्रिया कोणावर घडते, हें दाखवीत आहे; म्हणजे तो शब्द आणतील ह्या क्रियापदाचें **कर्म** आहे; व त्याची येथें द्वितीया विभक्ति आहे. या विभक्तीच्या योगानें त्याचा ' आणतील ' या **क्रियापदाशीं** संबंध जुळला आहे.

**बैलगाडीनें**—हा शब्द कोणत्या **साधनानें** आणतील हें दाखवीत आहे; व त्याची येथें तृतीया विभक्ति आहे. या विभक्तीच्या योगानें त्याचा ' आणतील ' या **क्रियापदाशीं** संबंध जुळला आहे.

**साताऱ्याहून**—हा शब्द **कोठून** आणतील हें सांगत आहे; म्हणजे तें सांगण्यासाठीं ह्या शब्दाचा ' आणतील ' या **क्रियापदाशीं** संबंध जुळला आहे; व त्याची येथें पंचमी विभक्ति आहे.

**घरीं**—ह्या शब्दावरून **कोठें** आणतील हें कळत आहे; व तें **ठिकाण** सांगण्यासाठीं ' आणतील ' ह्या **क्रियापदाशीं** त्या शब्दाचा संबंध जुळलेला दिसत आहे; त्याची येथें सप्तमी विभक्ति आहे.

म्हणजे ह्या ठिकाणीं **' बाबा '** हा मूळ शब्द तसाच राहून, ' ताई ' ह्याचें **ताईला,** ' बैलगाडी ' ह्याचें **बैलगाडीनें,** ' सातारा ' ह्याचें **साताऱ्याहून,** व ' घर ' ह्याचें **घरीं,** अशीं रूपें होऊन, त्या सर्वांचा ' आणविलें ' ह्या **क्रियापदाशीं** संबंध जोडला गेला आहे; तेव्हां नामाचीं हीं जीं विभक्तींचीं रूपें होतात, तीं **क्रियापदाशीं** नामाचा **कर्ता, कर्म, साधन, ठिकाण,** इ० प्रकारचा संबंध जोडितात; असें झालें.

[ ३ ]

आतां खालील वाक्यें पहा:—

१. नानासाहेबानें **ब्राह्मणांस** दक्षिणा दिली.

२. बाजिरावानें **इंग्रजांस** राज्य दिलें.

३. औरंगजेबानें **संभाजीस** राजा हा किताब दिला.

ह्या वाक्यांत कोणाला दक्षिणा दिली? **ब्राह्मणांस;** कोणाला राज्य दिलें? **इंग्रजांस**; कोणाला किताब दिला? **संभाजीस;** ह्याप्रमाणें ज्याला द्यावयाचें त्या शब्दांची चतुर्थी विभक्ति आहे; व तिचा संबंधही 'दिलें' ह्या **क्रियापदाशींच** दिसत आहे.

---

## ११. विभक्तींचें कार्य—२

[ १ ]

आतां ह्या खालील वाक्यांतील नामांचा कोणाशीं ज्यास्त संबंध आहे, पहा बरें?

१. हीं **कागदांचीं** पुडकीं नीट बांधून ठेव.

२. **गोविंदरावांचा** मुलगा बी० ए० झाला.

३. **शहाण्याचें** मन वळवितां येतें.

ह्या ठिकाणीं 'कागदांचीं' ह्या शब्दाचा ठेव ह्या क्रियापदाशीं कांहीं संबंध वाटतो काय? **'कागदांचीं पुडकीं'** असें आपण

म्हणतों; यावरून कागदांचीं ह्या शब्दाचा संबंध येथें ठेव ह्या क्रियापदाशीं दिसत नाहीं; 'पुडकीं' ह्या **शब्दाशीं** दिसतो; हें उघड आहे.

त्याचप्रमाणें दुसऱ्या वाक्यांत 'गोविंदरावांचा' ह्या शब्दाचा संबंध झाला ह्या क्रियापदाशीं दिसत नाहीं; तर **'गोविंदरावांचा मुलगा'** असें आपण म्हणतों; यावरून त्याचा संबंध मुलगा ह्या **शब्दाशीं** दिसतो. तसेंच, तिसऱ्या वाक्यांत 'शहाण्याचें' ह्या शब्दाचा संबंध येतें ह्या क्रियापदाशीं नसून, **'शहाण्याचें मन'** असें आपण म्हणतों; यावरून त्याचा संबंध मन ह्या **शब्दाशीं** आहे.

४. **डोळ्यांनीं** आंधळ्या धृतराष्ट्रानें भीमास जवळ बोलाविलें.

ह्या वाक्यांत 'डोळ्यांनीं' ह्या शब्दाचा बोलाविलें ह्या क्रियापदाशीं कांहीं संबंध वाटतो का ? **'डोळ्यांनीं** बोलाविलें' असें म्हणणें कांहीं जमत नाहीं; यावरून 'डोळ्यांनीं' ह्या शब्दाचा संबंध 'बोलाविलें' ह्या क्रियापदाशीं नसून, **'डोळ्यानीं आंधळा'** असें आपण म्हणतों; म्हणून 'डोळ्यांनीं' ह्या शब्दाचा संबंध आंधळा ह्या **शब्दाशीं** आहे.

[ २ ]

वरील विचारावरून असें दिसतें कीं, विभक्ति ह्या नामाचा नेहमीं क्रियापदाशींच संबंध जोडितात, असें नाहीं; तर **क्रियापदाशिवाय इतर शब्दांशींही** नामाचा संबंध जोडितात.

विभक्तींच्या योगानें क्रियापदाशीं व इतर शब्दाशीं जडलेल्या

नामाच्या संबंधास " **विभक्तींचा अर्थ** " असें म्हणतात. **क्रियापदाशीं** असलेल्या त्या संबंधांचीं नांवें खालीलप्रमाणें आहेत:—

( १ ) **कर्ता,** ( २ ) **कर्म,** ( ३ ) 'साधन' यालाच **करण** हें नांव ज्यास्त प्रचारांत आहे, ( ४ ) ज्याला द्यावयाचें त्या शब्दाची चतुर्थी विभक्ति असते व तिच्या क्रियापदाशीं असलेल्या संबंधाला **संप्रदान** असें म्हणतात, ( ५ ) 'दूर जाणें' ह्या अर्थी जी विभक्ति उपयोगांत येते तिच्या क्रियापदाशीं असलेल्या संबंधाला **अपादान** असें म्हणतात, त्याचप्रमाणें ( ६ ) स्थान दाखविणाऱ्या विभक्तीच्या संबंधाला **अधिकरण** असें म्हणतात. नामाचा क्रियापदाशीं व इतर शब्दांशीं संबंध दाखविणें हें विभक्तींचें कार्य होय.

   

आज आपणांस काय समजलें ?

**१. विभक्ति, क्रियापदाशीं व वाक्यांतील दुसऱ्या शब्दांशींही नामाचा संबंध जोडितात.**

**२. कर्ता, कर्म, करण, संप्रदान, अपादान, अधिकरण, ह्या प्रकारचा नामांचा क्रियापदाशीं संबंध आढळतो.**

**३. नामाचा क्रियापदाशीं किंवा दुसऱ्या शब्दाशीं जो संबंध असतो, त्याला त्या " विभक्तीचा अर्थ " असें म्हणतात.**

---

## प्रश्न व गृहपाठ

१. विभक्ति मुख्यतः काय काम करितात ?

२. नामाचा क्रियापदाशीं किती प्रकारचा संबंध आढळतो ?

३. विभक्तींमुळें नामाचे क्रियापदाशीं जे संबंध आढळतात, त्यांचीं नांवें व एकेक उदाहरण घरून लिहून आणा.

४. " **विभक्तींचा अर्थ** " म्हणजे काय ?

५. कोणत्या विभक्तीचा **संप्रदान** या नात्यानें संबंध असतो ? तो संबंध कसा ओळखावा ?

६. नामाचा क्रियापदाशिवाय इतर शब्दांशीं संबंध असतो, हें कशावरून ? एकादें उदाहरण सांगा.

७. खालील ठळक शब्दांच्या विभक्तींचे कोणत्या अर्थानें कोणाशीं संबंध आहेत, तें सांगाः

( १ ) **गवळी गाय** बांधितो. ( २ ) **मुलें अभ्यास** करितात. ( ३ ) **चितू पुस्त्या** लिहील. ( ४ ) **शिक्षकांनीं** मुलांस शिकविलें. ( ५ ) **मुलांनीं** फार **अभ्यास** केला. ( ६ ) **सुतारानें करवतीनें फळ्या** कापिल्या. ( ७ ) **त्याला दांतांनीं** चावतां येत नाहीं. ( ८ ) **मुलांनीं बेडकांस त्रास** दिला. ( ९ ) **घरून शाळा** लांब आहे. ( १० ) एक वर्षांत सूर्याभोंवतीं **पृथ्वीची प्रदक्षिणा** होते. ( ११ ) **दूध** हें **मुलांचें अन्न** आहे. ( १२ ) परवां **गांवीं** गेलों. ( १३ ) काल **घरीं** आलों. ( १४ ) **शिवाजीनें** त्या **शेतकऱ्यास इनाम** दिलें. ( १५ ) **लेखणीनें** लिही.

---

# १२. विभक्तींचे अर्थ – १

---

मागील पाठांत विभक्तींचे **संबंध** म्हणजे **अर्थ** घ्यानांत आले. आतां एकेका विभक्तीपासून **कर्ता, कर्म, करण, संप्रदान, अपादान, अधिकरण,** ह्यांपैकीं किती प्रकारचे संबंध नामाचे क्रियापदाशीं जुळतात, तें पाहूं.

## प्रथमा.

| | |
|---|---|
| ( अ ) **रामा** जातो<br>( आ ) **रामा** गोविंदाला बोलावितो | ह्या दोन्ही वाक्यांत 'रामा' ह्या शब्दाची **प्रथमा** विभक्ति आहे, व तिच्या योगानें 'रामा' ह्या शब्दाचा |

क्रियापदाशीं " **कर्ता** " ह्या नात्यानें संबंध जुळला आहे.

| | |
|---|---|
| ( क ) रामानें **आंबा** खाल्ला<br>( ख ) मीं **फळ** तोडिलें | ह्या ठिकाणीं 'आंबा' व 'फळ' ह्या शब्दांची **प्रथमाच** विभक्ति |

आहे; व तिच्या योगानें त्या शब्दांचा क्रियापदाशीं वरच्यासारखा संबंध जुळला नसून, " **कर्म** " ह्या नात्यानें संबंध जुळला आहे.

| | |
|---|---|
| ( च ) मी सर्व **रान** हिंडलों<br>( छ ) तो पांच मैल लांब **रस्ता** चालला | ह्या ठिकाणीं 'रान' व 'रस्ता' ह्या शब्दांची विभक्ति **प्रथमाच** आहे; पण तिच्या योगानें 'रान' व |

'रस्ता' ह्या शब्दांचा क्रियापदाशीं कर्ता किंवा कर्म ह्या नात्यांचा संबंध दिसून येत नसून, ठिकाण म्हणजे " **अधिकरण** " ह्या नात्याचा संबंध दिसत आहे.

ह्याप्रमाणें एका प्रथमा विभक्तीचे **कर्ता, कर्म** व **अधिकरण** असे तीन प्रकारचे संबंध म्हणजेच अर्थ आढळून येत आहेत.

## द्वितीया.

| | |
|---|---|
| ( अ ) गाय **दूध** देते<br>( आ ) हरि **पुस्तक** वाचितो | ह्या ठिकाणीं 'दूध' व 'पुस्तक' हे शब्द कर्में आहेत; म्हणून त्यांची द्वितीया विभक्ति आहे व त्या |

द्वितीया विभक्तीचा क्रियापदाशीं " **कर्म** " ह्या नात्यानें संबंध आहे.

| | |
|---|---|
| (क) शिक्षक **मुलांस** शिकवितात<br>(ख) कृष्णानें **कंसाला** मारिलें | ह्या ठिकाणीं 'मुलांस' व 'कंसाला' ह्या शब्दांवर क्रिया घडत आहे, त्यामुळें हे शब्द |

'शिकवितात' व 'मारिलें' ह्या क्रियापदांचीं अनुक्रमें **कर्मे** आहेत; म्हणून ह्या शब्दांच्या द्वितीया विभक्तीचा अर्थ " **कर्म** " हा आहे.

## तृतीया.

| | |
|---|---|
| ( अ ) **मुलीनें** गाणें म्हटलें<br>( आ ) **कौरवांनीं** गाई नेल्या<br>( इ ) **तिनें** नित्य पहाटेस उठावें | ह्या ठिकाणीं 'मुलीनें,' 'कौरवांनीं' व 'तिनें' ह्या शब्दांच्या तृतीयेचा अर्थ " **कर्ता** " आहे. |
| ( क ) तूं **पायानें** टेबल ढकलिलें<br>( ख ) मीं **चाकूनें** लेखणी केली | ह्या ठिकाणीं 'पायानें' व 'चाकूनें' ह्या शब्दांच्या तृतीयेचा अर्थ " **करण** " हा आहे. |
| ( च ) ह्या **रस्त्यानें** कांटे आहेत<br>( छ ) रुळलेल्या **मार्गानें** जावें | ह्या ठिकाणीं 'रस्त्यानें' व 'मार्गानें' ह्या शब्दांच्या तृतीया विभक्तीचा अर्थ "**अधिकरण**" आहे. |

ह्याप्रमाणें तृतीया विभक्तीमुळेंही नामाचा क्रियापदाशीं एकाच प्रकारचा संबंध जुळत नसून **कर्ता, करण** व **अधिकरण** ह्या तीन नात्यांनीं तिचा क्रियापदाशीं संबंध जुळतो; असें दिसून येतें.

---

# १३. विभक्तींचे अर्थ—२

## चतुर्थी.

ह्या विभक्तीमुळें नामाचे क्रियापदाशीं खालील प्रकारचे संबंध जुळतात:—

| | |
|---|---|
| (अ) नानासाहेबानें **ब्राह्मणांस** दक्षिणा दिली<br>(आ) शिक्षकांनीं **विद्यार्थ्यांस** धडा शिकविला | ह्या दोन्ही वाक्यांत '**ब्राह्मणांस**' व '**विद्यार्थ्यांस**' ह्या शब्दांच्या चतुर्थी विभक्तीचा अर्थ "**संप्रदान**" हा आहे. |
| (क) **रामाला** बसवतें<br>(ख) **आम्हांला** हें काम करवेल | ह्यांतील '**रामाला**' व '**आम्हांला**' ह्या शब्दांच्या चतुर्थी विभक्तीचा अर्थ "**कर्ता**" हा आहे. |
| (च) आज माझ्या **चित्तास** समाधान झालें<br>(छ) आनंद **डोळ्यांस मनास** होई | ह्या वाक्यांतील '**चित्तास**,' '**डोळ्यांस**' व '**मनास**' ह्या शब्दांच्या चतुर्थी विभक्तीचा अर्थ "**अधिकरण**" हा आहे. |

म्हणजे चतुर्थी विभक्तीमुळेंही **संप्रदान, कर्ता** व **अधिकरण,** ह्या तीन नात्यांनीं नामाचा क्रियापदाशीं संबंध जुळतो; असें दिसून आलें.

## पंचमी.

| | |
|---|---|
| ( अ ) मी **मुंबईहून** आलों<br>( आ ) **घरून** शाळा दोन फर्लांग आहे | ह्या ठिकाणीं '**मुंबईहून**' व '**घरून**' ह्या शब्दांच्या पंचमी विभक्तीचा अर्थ " **अपादान** " हा आहे. |
| ( क ) कृष्णाच्या **हातून** दूध सांडलें | येथें '**हातून**' ह्या पंचमीचा अर्थ '**करण**' हा आहे. |

## षष्ठी.

[ **गोविंदरावांचा** मुलगा, **दाराची** कडी, **पिंपळाचें** पान, ह्या ठिकाणीं गोविंदरावांचा, दाराची व पिंपळाचें, ह्या शब्दांची **षष्ठी** विभक्ति आहे; पण हे शब्द कांहीं क्रियापदाचा कर्ता, कर्म, करण, संप्रदान, अपादान, अधिकरण, हे अर्थ दाखवीत नाहींत; यावरून षष्ठी विभक्तीचा क्रियापदाशीं संबंध फार करून येत नसावा असें दिसतें. तिचा संबंध फक्त पुढल्या **शब्दाशींच** येतो. या षष्ठी विभक्तीच्या अर्थाला " **संबंध** " असेंच म्हणतात. ]

## सप्तमी.

| | |
|---|---|
| ( क ) मी **गांवीं** गेलों<br>( ख ) कंसाला **जळीं, स्थळीं,** कृष्ण दिसे<br>( ग ) तो माझ्या **पायां** पडला | ह्या ठिकाणीं '**गांवीं,**' '**जळीं,**' '**स्थळीं,**' व '**पायां**' ह्या शब्दांच्या सप्तमी विभक्तीचा अर्थ " **अधिकरण** " हा आहे. |

## संबोधन.

[ " **मुलांनो,** तुम्ही उठा. " " **आई,** मला भूक लागली. " ह्या वाक्यांत 'मुलांनो' व 'आई' ह्या शब्दांची **संबोधन**-विभक्ति आहे; पण तिच्यामुळें त्या शब्दांचा **क्रियापदाशीं** कर्ता, कर्म, करण, संप्रदान, अपादान, अधिकरण,

ह्यांपैकीं कोणत्या तरी अर्थानें संबंध आहे काय ? विचार केल्यास षष्ठीप्रमाणेंच ह्या **संबोधन**-विभक्तीचाही क्रियापदाशीं कांहीं संबंध नाहीं, असें दिसून येईल. ]

   

ह्यावरून आज कोणत्या गोष्टी आपणांस कळून आल्या ?

**१. मराठींत एकेका विभक्तीचा एकेक ठराविक अर्थ असतो, असें नाहीं.**

**२. विशेषतः प्रथमा, तृतीया व चतुर्थी, ह्या विभक्तींचे अनेक अर्थ आढळून येतात.**

**३. द्वितीया विभक्तीचा मात्र " कर्म " हा एकच अर्थ असतो.**

**४. षष्ठी व संबोधन ह्या विभक्तींचा क्रियापदाशीं संबंध नसतो.**

---

## प्रश्न व गृहपाठ

१. वाक्यांत नामाचा कोणाकोणाशीं संबंध असतो ?

२. प्रथमा, तृतीया व चतुर्थी ह्या विभक्तींचा क्रियापदाशीं किती प्रकारचा संबंध आढळतो ?

३. मराठींत एका विभक्तीचा क्रियापदाशीं एकच ठराविक संबंध असतो काय ?

४. कोणत्या विभक्तीचा क्रियापदाशीं एकच ठराविक संबंध आढळतो ?

५. **करण, संप्रदान, अपादान** व **अधिकरण** म्हणजे काय ? यांतील एकेका अर्थाचीं दोन दोन उदाहरणें वाक्यांत योजून तीं घरून लिहून आणा.

६. खालील वाक्यांतील ठळक शब्दांच्या विभक्तींचे अर्थ कोणते ? कां ?

( १ ) **फळ** पडलें. मीं **फळ** खाल्लें.

( २ ) राम **रावण** मारितो. रामानें **रावणास** मारिलें.

( ३ ) **गोविंदानें पेन्सिलीनें** लिहिलें. सरळ **वाटेनें** जा.

( ४ ) त्यानें **भिकाऱ्याला** पैसा दिला. **मला त्यास** पैसा द्यावयाचा नाहीं.

( ५ ) **मुंबईहून** आलों, **साताऱ्याहून** आलों नाहीं.

( ६ ) त्याच्या **घरीं** दाणे नाहींत. तो दोन **दिवस** उपाशींच आहे. **देवळांत** निजतो.

( ७ ) **बंडूचा** अंगरखा फाटला. **भिमीची** अंगठी हरवली.

---

# १४. काळ

**काळ** म्हणजे क्रिया घडण्याची **वेळ.**

१. क्रियापदावरून क्रिया **चालू आहे** असें कळत असलें, म्हणजे त्या क्रियापदाला "**वर्तमानकाळीं**" क्रियापद असें म्हणतात.

२. क्रियापदावरून क्रिया **मागें झाली** असें कळत असलें, म्हणजे त्या क्रियापदाला "**भूतकाळीं**" क्रियापद असें म्हणतात.

३. क्रियापदावरून क्रिया **पुढें व्हावयाची आहे** असें कळत असलें, म्हणजे त्या क्रियापदाला "**भविष्यकाळीं**" क्रियापद असें म्हणतात.

ह्या गोष्टी पूर्वींच आपण शोधून पाहिल्या आहेत; आतां **काळा**-संबंधानें आणखी कांहीं गोष्टी विचार करण्यासारख्या आहेत कीं काय, त्या हुडकून काढूं.

[ १ ]

| | |
|---|---|
| १. गोविंदा **जातो**<br>२. मी काम **करितों**<br>३. विमल **बसते**<br>४. ती चित्रें **काढिते** | **वर्तमानकाळ.** |
| १. गोविंदा **गेला आहे**<br>२. मीं काम **केलें आहे**<br>३. विमल **बसली आहे**<br>४. तिनें चित्रें **काढिलीं आहेत** | **वर्तमानकाळच;** (पण येथें क्रियेच्या **पूर्णतेचा** ज्यास्त अर्थ कळत आहे) |

| | |
|---|---|
| १. गोविंदा **जात आहे**<br>२. मी काम **करीत आहें**<br>३. विमल **बसत आहे**<br>४. ती चित्रें **काढीत आहे** | **वर्तमानकाळच;** (पण येथें क्रियेच्या **अपूर्णतेचा** ज्यास्त अर्थ कळत आहे) |
| १. गोविंदा **जात असतो**<br>२. मी काम **करीत असतों**<br>३. विमल **बसत असते**<br>४. ती चित्रें **काढीत असते** | **वर्तमानकाळच;** (पण येथें क्रियेच्या **रीतीचा** ज्यास्त अर्थ कळत आहे) |

याप्रमाणें कोणत्याही क्रियापदाचीं आपणांस वर्तमानकाळाचीं अशीं चार रूपें पुष्कळ वेळां आढळून येतात, या रूपांना नांवें काय बरें द्यावीं ? ज्यापेक्षां ह्या रूपांवरून निरनिराळा कांहीं ज्यास्त अर्थ कळत आहे, त्यापेक्षां त्या अर्थास अनुसरून त्यांना आपण अनुक्रमें **वर्तमानकाळ, पूर्णवर्तमानकाळ, अपूर्णवर्तमानकाळ,** व **रीतिवर्तमानकाळ,** अशीं नांवें देऊं.

[ २ ]

| | |
|---|---|
| १. मी गुरूजवळ विद्या **शिकलों**<br>२. तूं काल पुस्त्या **लिहिल्यास**<br>३. विमल शाळेंतून घरीं **आली**<br>४. तिनें सुंदर रांगोळ्या **काढिल्या** | **भूतकाळ.** |
| १. मी इंग्रजी **शिकलों होतों**<br>२. तूं काल पुस्त्या **लिहिल्या होत्यास**<br>३. विमल नुकतीच घरीं **आली होती**<br>४. तिनें सुंदर रांगोळ्या **काढिल्या होत्या** | **भूतकाळच;** (पण येथें क्रियेच्या **पूर्णतेचा** अर्थ ज्यास्त कळत आहे) |

| | |
|---|---|
| १. मी विद्या **शिकत होतों**<br>२. तूं काल पुस्त्या **लिहीत होतास**<br>३. विमल घरीं **येत होती**<br>४. ती सुंदर रांगोळ्या **काढीत होती** | **भूतकाळच;** ( पण येथें क्रियेच्या **अपूर्णतेचा** अर्थ ज्यास्त कळत आहे ) |
| १. मी विद्या **शिकें** किंवा **शिकत असें**<br>२. तूं रोज पुस्त्या **लिहीत असस**<br>३. विमल पांच वाजतां घरीं **येई** किंवा **येत असे**<br>४. नंतर ती रोज सुंदर रांगोळ्या **काढी** किंवा **काढीत असे** | **भूतकाळच;** ( पण येथें क्रियेच्या **रीतीचा** ज्यास्त अर्थ कळत आहे ) |

वर्तमानकाळांतील रूपांप्रमाणेंच भूतकाळींही वरील चार प्रकारचीं रूपें आढळतात; त्यांस आपण त्यांनीं दर्शविलेल्या अर्थांस अनुसरून अनुक्रमें **भूतकाळ, पूर्णभूतकाळ, अपूर्णभूतकाळ,** व **रीति-भूतकाळ,** अशीं वरच्यासारखींच नांवें देऊं.

[ ३ ]

| | |
|---|---|
| १. मी **बसेन**   २. आम्ही घरीं **जाऊं**<br>३. तुम्ही **याल**   ४. तो पैसे **देईल** | **भविष्यकाळ.** |
| १. मी **बसलों असेन**<br>२. तो घरीं **गेला असेल**<br>३. तुम्ही **आलां असाल** | **भविष्यकाळच;** ( पण येथें क्रियेच्या **पूर्णतेचा** जास्त अर्थ कळत आहे ) |

| | |
|---|---|
| १. मी **बसत असेन**<br>२. तो **जात असेल**<br>३. तुम्ही **येत असाल** | **भविष्यकाळच**; ( पण येथें क्रियेच्या **अपूर्णतेचा** बोध होत आहे ) |
| १. मी असाच रोज दाराशीं **बसत राहीन**<br>२. तो **जात राहील**<br>३. तुम्ही **येत रहाल** | **भविष्यकाळच**; ( पण येथें क्रियेच्या **रीतीचा** ज्यास्त अर्थ कळत आहे) |

याप्रमाणें भविष्यकाळाचींही चार प्रकारचीं रूपें आढळतात; यांनाही आपण वरच्यासारखींच अनुक्रमें **भविष्यकाळ, पूर्णभविष्यकाळ, अपूर्णभविष्यकाळ,** व **रीतिभविष्यकाळ,** अशीं नांवें देऊं.

वाक्यांतील क्रियापदावरून **वेळ** व क्रियेची **स्थिति** हीं वरील-प्रमाणें आपल्या ध्यानांत येतात. **काळ** आपल्यास सहज कळतो; क्रियेची **स्थिति** कोणत्या **काळीं** व **कशा प्रकारची** आहे, हें दर्शविण्याची जरूरी असल्यास, वरील आपण योजिलेलीं नांवें आपणांस उपयोगीं पडतील. ध्यानांत राहण्यासाठीं हीं नांवें पुनः आठवूं—

| | | |
|---|---|---|
| १. **वर्तमान** | १. **भूत** | १. **भविष्य** |
| २. पूर्णवर्तमान | २. पूर्णभूत | २. पूर्णभविष्य |
| ३. अपूर्णवर्तमान | ३. अपूर्णभूत | ३. अपूर्णभविष्य |
| ४. रीतिवर्तमान | ४. रीतिभूत | ४. रीतिभविष्य |

ह्या ठिकाणीं काळांना पूर्णवर्तमान, पूर्णभूत, पूर्णभविष्य; अपूर्ण-वर्तमान, अपूर्णभूत, अपूर्णभविष्य; व रीतिवर्तमान, रीतिभूत, रीति-

भविष्य; अशीं नांवें दिलीं आहेत खरीं; परंतु खरोखर पाहिलें तर काळ म्हणजे वेळ. तिचा पूर्णपणा किंवा अपूर्णपणा कसा कळणार ? अर्थात् वरच्या नांवांवरून काळाची पूर्णता, अपूर्णता किंवा रीति कळण्यापेक्षां वाक्यांतील क्रिया घडण्याची पूर्णता, अपूर्णता किंवा रीति कळते; असें समजलें पाहिजे.

[ आपल्या बोलण्यांत **'जाणार आहे,'** **'करणार आहे,'** अशींही एका प्रकारच्या वर्तमानकाळाचीं रूपें आढळतात; त्याचप्रमाणें **'जाणार होता,'** **'करणार होता'** अशीं भूतकाळाचीं रूपें आढळतात; आणि **'जाणार असेल,'** **'करणार असेल,'** अशीं भविष्यकाळाचीं रूपें आढळतात. यांच्यावरून क्रियेचा हेतु म्हणजे उद्देश कळतो; म्हणून त्यांना अनुक्रमें **उद्देश्यवर्तमान, उद्देश्यभूत** व **उद्देश्यभविष्य** असें म्हणतात. हीं नांवेंही आपणांस माहीत हवींत. ]

   

ह्यावरून आपणांस कोणत्या गोष्टी कळल्या ?

**१. काळ म्हणजे क्रिया घडण्याची वेळ. वर्तमानकाळ, भूतकाळ व भविष्यकाळ; असे तीन काळ मानिले आहेत.**

**२. ह्या प्रत्येक काळाचे क्रियेची पूर्णता, अपूर्णता किंवा रीति कळणें, ह्यावरून आणखी तीन तीन प्रकार मानिले आहेत.**

---

## प्रश्न व गृहपाठ

१. खा, ये, पी, दे, ह्या धातूंचीं **वर्तमानकाळीं** सर्व रूपें सांगा.

२. जा, बस, रहा, पहा, ह्या धातूंचीं **भूतकाळीं** सर्व रूपें सांगा.

३. ने, मान, पाज, पाड, ह्या धातूंचीं **भविष्यकाळीं** सर्व रूपें द्या.

४. अपूर्णवर्तमानकाळ, पूर्णभविष्यकाळ व रीतिभूतकाळ हे कसे ओळखाल ?

५. खालील वाक्यांतील क्रियापदांचे **काळ** ओळखून घरून लिहून आणा:—

(१) आकाशांत तारे **आहेत.** (२) मी रोज डोंगरावर फिरावयास **जात असतों.** (३) त्यानें पंचवीस जोर **काढिले.** (४) तो रोज पंचवीस जोर **काढीत असतो.** (५) तुम्ही मजकडे **याल,** (६) तेव्हां मी **जेवीत असेन.** (७) मी पत्र **लिहिणार आहें,** (८) बाबा **लिहिणार होते,** (९) ते आज **लिहिणार असतील.** (१०) तो मंडईंत **गेला होता.**

---

# १५. क्रियापदाचा पुरुष, लिंग व वचन

## [ १ ]

आपल्यास कोणत्याही विकारी शब्दाचें लिंग व वचन **हीं** ओळखतां येतात. उदाहरणार्थ—

| | |
|---|---|
| **गोविंदा**—हा पुल्लिंगी ए० व० शब्द | **जी**—हा स्त्रीलिंगी ए० व० शब्द |
| **गाई**—हा स्त्रीलिंगी अ० व० शब्द | **असें**—हा नपुंसकलिंगी ए० व० शब्द |
| **वासरूं**—हा नपुं० ए० व० शब्द | **बसल्या**-हा स्त्रीलिंगी अ० व० शब्द |
| **चांगले**—हा पुल्लिंगी अ० व० शब्द | **द्यावीं**—हा नपुं० अ० व० शब्द |

आतां लिंग व वचन ह्यांशिवाय विकारी शब्दांच्या संबंधानें आणखी एकादी गोष्ट आपल्याला आढळून येते कीं काय, तें पाहूं.

आपल्याला हें माहीतच आहे कीं, बोलणारा आपल्याबद्दल **मी** व **आम्ही** हीं सर्वनामें वापरतो; आणि ज्याच्याशीं बोलावयाचें त्याच्याबद्दल **तूं** व **तुम्ही** हीं सर्वनामें वापरतो; बाकीच्या सर्वांबद्दल बोलणारा इतर सर्वनामें वापरतो.

बोलणारा हा ' पहिला पुरुष,' किंवा ' पहिला मनुष्य ' म्हणून त्याच्याबद्दल येणाऱ्या **मी** व **आम्ही** ह्या सर्वनामांना—ह्या शब्दांना—**प्रथम पुरुषवाचक सर्वनामें** म्हणतात; ज्याच्याशीं बोलावयाचें तो ' दुसरा पुरुष ' किंवा ' दुसरा मनुष्य ' म्हणून त्याच्याबद्दल येणाऱ्या **तूं** व **तुम्ही** ह्या सर्वनामांना—ह्या शब्दांना—**द्वितीय पुरुषवाचक सर्वनामें** म्हणतात; आणि ज्या ' तिसऱ्यांविषयीं ' बोलावयाचें त्यांबद्दल येणाऱ्या बाकीच्या सर्वनामांचा व शब्दांचा **तृतीय पुरुष** मानितात; हें आपल्यास माहीतच आहे.

म्हणजे असें झालें कीं, आपल्या भाषेंत **मी, आम्ही,** हे एवढेच शब्द **प्रथम पुरुषीं** आहेत; **तूं** व **तुम्ही** हे एवढेच शब्द **द्वितीय पुरुषीं** आहेत; आणि ह्यांशिवाय इतर सर्व विकारी शब्द **तृतीय पुरुषीं** आहेत.

यावरून आपल्या भाषेंतला कोणताही विकारी शब्द घेतला, तरी त्या शब्दाला ज्याप्रमाणें लिंग व वचन हीं असतात, त्याप्रमाणेंच त्याचा **पुरुष**ही असतो. सर्वनामांचा पुरुष आपण सांगतों; नामांचा, विशेषणांचा, सांगत नाहीं इतकेंच; तरी पण **सर्व विकारी शब्दांना पुरुष हा असतोच;** ही गोष्ट आपण ध्यानांत ठेविली पाहिजे.

[ २ ]

नामांना व विशेषणांना जरी पुरुष असला, तरी तो सांगण्याची तितकी आवश्यकता वाटत नाहीं; पण **क्रियापदाचा पुरुष** मात्र वाक्याची जुळणी कशा प्रकारची आहे हें कळण्यासाठीं, समजण्याची फार जरूरी आहे; म्हणून आपण त्याबद्दल आतां विचार करूं.

खालील वाक्यांतील क्रियापदें कोणत्या **पुरुषीं** आहेत, तें विचार करून सांगा बरें ?.

(१) मी काम **करितों**— **प्रथम पुरुषीं** क्रियापद.

तूं काम **करितोस**— **द्वितीय पुरुषीं** क्रियापद.

हा, तो, जो, काम **करितो**—**तृतीय पुरुषीं** क्रियापद.

हें आपल्यास सहज ओळखतां आलें. परंतु,

| | | |
|---|---|---|
| (२) मीं काम **केलें** | (हीं कोणत्या पुरुषीं क्रिया- | हीं |
| आम्हीं काम **केलें** | पदें ? प्रथम पुरुषीं ? ) | **तृतीय** |
| तूं चिंच **खाल्ली** | (हीं कोणत्या पुरुषीं क्रिया- | **पुरुषीं** |
| तुम्हीं चिंचा **खाल्ल्या** | पदें ? द्वितीय पुरुषीं ? ) | **क्रियापदें.** |

नीट विचार केला तर आपल्या ध्यानांत येईल कीं, वरच्या वाक्यांत **कर्तरिप्रयोग** आहे; आणि खालच्या वाक्यांत **कर्मणि-प्रयोग** आहे; म्हणून कर्तरि-प्रयोगांत कर्त्याच्या पुरुष–लिंग–वचनाप्रमाणें व कर्मणि-प्रयोगांत कर्माच्या पुरुष–लिंग–वचनाप्रमाणें क्रियापद असणार; हें उघडच आहे. यामुळें पहिल्या तिन्ही वाक्यांतील क्रियापदांचे वर लिहिलेले पुरुष बरोबर आहेत; पण कर्मणि-प्रयोगांत कर्त्याच्या पुरुष–लिंग–वचनाप्रमाणें क्रियापद असणार नाहीं, तर तें कर्माच्याच पुरुष–लिंग–वचनाप्रमाणें असणार. ह्यामुळें खालचीं उदाहरणें कर्मणि-प्रयोगाचीं असल्यानें, कर्ता प्रथम पुरुषीं किंवा द्वितीय पुरुषीं आहे, तरी क्रियापदें त्या पुरुषीं नाहींत; तर अर्थात् कर्माच्या पुरुषाप्रमाणें आहेत; म्हणजे **तृतीय पुरुषीं** आहेत. **क्रियापदाचा पुरुष** ओळखतांना क्रियापद कोणाप्रमाणें आहे, हें पहावयासच पाहिजे.

[ ३ ]

त्याचप्रमाणें—

| | |
|---|---|
| ( ३ ) मीं मुलास **निजविलें** ( क्रियापद प्रथम पुरुषीं नाहीं )<br>तुम्हीं गाईस **बांधिलें** ( क्रियापद द्वितीय पुरुषीं नाहीं )<br>तिनें घरीं **जावें** .... .... .... .... | हीं **तृतीय पुरुषीं** क्रियापदें आहेत. |

ह्या ठिकाणींही कर्ते प्रथम पुरुषीं, द्वितीय पुरुषीं व तृतीय पुरुषीं आहेत खरे, परंतु क्रियापदें कांहीं प्रथम पुरुषीं किंवा द्वितीय पुरुषीं नाहींत; तीं **तृतीय पुरुषीं** आहेत. कारण येथें **भावे प्रयोग** असल्यामुळें क्रियापदें कर्त्याप्रमाणें किंवा कर्माप्रमाणें असणें शक्य नाहीं; तीं स्वतंत्र असणार. अर्थात् **मी—आम्ही,** हेच शब्द काय ते **प्रथम पुरुषीं** व **तूं—तुम्ही,** हे **द्वितीय पुरुषीं** असल्यानें, बाकीचे सर्व शब्द **तृतीय पुरुषींच** असणार; हें उघड आहे. त्यामुळें वरील वाक्यांतील क्रियापदेंही प्रथम पुरुषीं व द्वितीय पुरुषीं नसून, **तृतीय पुरुषीं** आहेत; हें ओघानेंच ठरलें.

याप्रमाणें कोणत्याही वाक्यांतील क्रियापदाचा पुरुष, लिंग व वचन हीं क्रियापद कोणाप्रमाणें आहे, हें पाहूनच ठरवावीं लागतात, असें झालें.

   

यावरून खालील गोष्टी आपणांस समजल्या:—

**१. कर्तरि-प्रयोगांत नेहमीं कर्त्याप्रमाणेंच क्रियापदाचा पुरुष, लिंग व वचन हीं असतात.**

**२. कर्मणि-प्रयोगांत कर्माप्रमाणेंच क्रियापदाचा पुरुष, लिंग व वचन हीं असतात; कर्त्याप्रमाणें नसतात.**

**३. भावे-प्रयोगांत क्रियापदाचा पुरुष, लिंग व वचन हीं कर्त्या-प्रमाणें किंवा कर्माप्रमाणेंही नसून, तें नेहमीं तृतीय पुरुषीं, नपुंसकलिंगीं, एकवचनींच असतें. मग कर्ता-कर्म यांचीं पुरुष-लिंग-वचनें कांहीं कां असतना?**

---

**प्रश्न गृहपाठ**

१ खालील वाक्यांतील क्रियापदांचे **पुरुष, लिंग, वचन,** हीं ओळखा:—

(१) मी जेवतों, (२) बाबा उठतात, (३) तूं त्यांना त्रास देऊं नको, (४) जो चोरी करील, (५) त्याला शिक्षा होईल, (६) तुम्ही कोणते खेळ खेळतां? (७) तिनें मुलीस चोपलें, (८) शिक्षकांनीं तुम्हांला शिकविलें, (९) आम्हीं धडा केला नाहीं, (१०) जर तुम्ही मुंबईस गेलां, (११) तर मला एक खेळणें घेऊन या.

---

# १६. क्रियापदांचे अर्थ

[ १ ]

आपल्यास कोणत्याही वाक्यांतील क्रियापदावरून क्रिया **चालू** आहे किंवा क्रिया **मागें** होऊन गेली आहे किंवा क्रिया **पुढें** होणार आहे, हें कळतें; त्यासंबंधाचा म्हणजे "**काळा**" संबंधाचा विचार आपण मागील एका पाठांत केला.

(१) रामा जातो, रामा काम करितो—**वर्तमानकाळ.**

(२) रामा गेला, रामानें काम केलें—**भूतकाळ.**

(३) रामा जाईल, रामा काम करील—**भविष्यकाळ.**

आतां खालील ठिकाणीं नक्की कोणत्या वेळेचा बोध होत आहे पहा बरें ?

१. " **खरें बोल** " — असें म्हटलें असतां **पुढें** खरें बोल, **आतां** खरें बोलूं नको, असा अर्थ होत नाहीं; तर नेहमींच म्हणजे **आतां** व **पुढेंही** खरें बोल असा अर्थ होतो. यावरून अशा क्रियापदानें नक्की वेळच कळते, असें नाहीं; तर वेळ कळते, पण त्यापेक्षां मुख्यतः कांहीं निराळी गोष्ट सांगावयाची आहे; असें दिसतें.

२. " **खरें बोलावें.** " — ह्या ठिकाणींही **काल** तेवढें खरें बोलावें, **आज** किंवा **उद्यां** खरें बोलूं नये, तसेंच **आज** किंवा **उद्यां** खरें बोलावें, **काल** खरें बोलूं नये; असा कांहीं नक्की वेळ कळतो, असें नाहीं; तर वेळेपेक्षां कांहीं तरी निराळी गोष्ट मुख्यतः सांगण्याचा हेतु दिसतो.

३. " **जर आपण खरें बोललों,** " तर आपलें कल्याण होतें. — केव्हां कल्याण होतें, हें ' **बोललों** ' एवढ्याच शब्दावरून नक्की कळतें काय ? " **जर आपण खरें बोललों** " म्हणजे **मागें** खरें बोललों तर कल्याण होतें, **आतां** किंवा **पुढें** खरें बोललों तर होत नाहीं का ? अर्थात् या वाक्यावरूनही वेळेपेक्षां मुख्यतः निराळीच कांहीं गोष्ट सांगावयाची आहे; असें दिसून येईल.

[ २ ]

मग वरच्यासारख्या वाक्यांतील क्रियापदांवरून वेळेशिवाय

दुसरी कोणती गोष्ट मुख्यतः सांगावयाची आहे, असें कळतें बरें ? आपण तें आतां शोधून पाहूं या.

(क) १. मी **जाऊं** ? .... ( येथें **आज्ञा** विचारिली आहे )
२. तूं **जा.** .... .... ( येथें दुसऱ्यास **आज्ञा** केली आहे)
३. आम्ही **येऊं** ? .... ( येथें **आज्ञा** मागितली आहे )
४. तुम्ही **या** .... .... ( येथें **आज्ञा** दिली आहे )
५. देवाची भक्ति **करा**.... ( येथें प्रत्यक्ष आज्ञा नाहीं, पण **विनंति** किंवा **उपदेश** आहे )
६. आपण जेवायला **या** ( येथें प्रत्यक्ष आज्ञा नाहीं, **विनंतिच** आहे )

यावरून या ठिकाणीं वेळेपेक्षां विशेषतः **आज्ञा** केलेलीच आढळून येत आहे. **आज्ञेचाच** किंवा **आज्ञा** मागण्याचा किंवा जवळ जवळ त्यासारखाच **विनंतीचा** अर्थ येथें कळून येत आहे. तेव्हां अशा प्रकारच्या क्रियापदांवरून "**आज्ञा**" हा अर्थ मुख्यतः कळत असल्या-मुळें, त्यांस "**आज्ञार्थी**" क्रियापदें असें म्हणण्यास काय हरकत आहे ? व त्या क्रियापदांचा 'आज्ञा' हा अर्थ म्हणजे "**आज्ञार्थ**" आहे, असेंही म्हणण्यास काय हरकत आहे ?

(ख) १. त्यानें **जावें**
२. मुलांनीं अभ्यास **करावा**
३. आपली एक बाग **असावी**
४. खूप पैसे **मिळावे**
५. मागें कीर्ति **उरावी**

ह्या वाक्यांतून 'आज्ञा' केली आहे काय ? किंवा 'विनंति' केली आहे काय ? नसेल, तर मग कोणता अर्थ विशेषतः कळून येत आहे ?

ह्या वाक्यांतील क्रियापदांवरून विशेषतः **कर्तव्य, इच्छा,** ह्या गोष्टी अधिक कळून येत आहेत; हें आपल्या सहजच ध्यानांत येईल. कर्तव्य ह्या शब्दाला ' विधि ' असा दुसरा एक शब्द आहे. यामुळें अशा प्रकारच्या क्रियापदांना " **विध्यर्थी** " क्रियापदें असें म्हणतात; व त्या क्रियापदांचा " **विध्यर्थ** " आहे, असें सांगतात.

(ग) १. " **जर खरें बोलता,** "
तर बाबा रागावले नसते.
२. " **जर अभ्यास करितास,** "
तर पास झाला असतास.
३. " **जर तो चोरटा असता,** "
तर त्याला शिक्षा झाली असती.

ह्यांतील ' जर ' हा शब्द आरंभीं असलेल्या वाक्यांवरून ' आज्ञा ' किंवा ' इच्छा ' कळत आहे काय ? नसेल, तर कोणता अर्थ विशेषतः कळत आहे ?

ह्या वाक्यांवरून **आज्ञा** किंवा **कर्तव्य**ही कळत नाहीं, हें स्पष्टच आहे; परंतु पुढील वाक्यामधील गोष्ट पहिल्या वाक्यावर अवलंबून आहे, असा अर्थ ह्या वाक्यांवरून विशेषतः कळत आहे. ह्याला " **संकेत** " असा एक चांगला शब्द आहे, म्हणून अशा वाक्यांना " **संकेतार्थी** " वाक्यें म्हणतात; व ह्या वाक्यांतील क्रियापदांचा **संकेत** हा मुख्यतः **अर्थ** आहे; म्हणून त्या क्रियापदांचा " **संकेतार्थ** " आहे, असें सांगतात.

[ ३ ]

ह्याप्रमाणें क्रियापदावरून केव्हां केव्हां काळापेक्षां वरच्या विशेष **अर्थांचा** मुख्यतः बोध होतो; म्हणून ह्या तिहींना क्रियापदांचे " **अर्थ** " असें म्हणतात.

**आज्ञार्थांत** आज्ञा, उपदेश, प्रार्थना, विनंति, ह्या गोष्टी येतात; व **विध्यर्थांत** विशेषतः धर्म, कर्तव्य, योग्यता किंवा इच्छा कळते; आणि **संकेतार्थांत** पहिल्या ' जर ' ह्या शब्दानें आरंभ होणाऱ्या वाक्यावरून कांहीं तरी बेत म्हणजे संकेत कळतो.

(घ) अगदीं आरंभीं रामा जातो, रामा जात नाहीं; रामा गेला, रामा गेला नाहीं; रामा जाईल, रामा जाणार नाहीं; अशीं मुख्यतः वर्तमानकाळ, भूतकाळ, व भविष्यकाळ दाखविणारींच क्रियापदाचीं रूपें दिलीं आहेत. त्या रूपांवरून आज्ञा, कर्तव्य, संकेत, असा कांहीं विशेष अर्थ कळत नाहीं; म्हणून अशा क्रियापदांना स्वतःचा काळाचा तेवढाच अर्थ दाखविणारीं म्हणून " **स्वार्थी** " क्रियापदें असें म्हणतात.

   

यावरून आज आपणांस कोणत्या गोष्टी आढळून आल्या ?

**१. क्रियापदावरून केव्हां केव्हां विशेषतः " काळ " कळतो.**

**२. क्रियापदावरून केव्हां केव्हां काळापेक्षां विशेषतः " अर्थ " कळतो.**

**३. क्रियापदाचे हे मुख्य चार अर्थ आहेत. (१) स्वार्थ, (२) आज्ञार्थ, (३) विध्यर्थ व (४) संकेतार्थ.**

---

## प्रश्न व गृहपाठ

१. क्रियापदाचा " **अर्थ** " म्हणजे काय ? ते मुख्यतः किती आहेत ?

२. **आज्ञार्था**वरून साक्षात् आज्ञेशिवाय आणखी कोणत्या कोणत्या गोष्टी कळतात ?

३. **विध्यर्थांत** विशेषतः कोणत्या गोष्टींचा बोध होतो ? त्यांत किंचित् अंशानें आज्ञा असते काय ? कशी ?

४. **आज्ञार्थ, विध्यर्थ व संकेतार्थ** ओळखण्याच्या कांहीं खुणा माहीत असल्यास सांगा.

५. पुढील वाक्यांतील क्रियापदांचे **अर्थ** सांगाः—

( १ ) मुलांनीं आईबापांची आज्ञा **मानावी.** ( २ ) आतां एक अक्षरही अधिक **बोलूं नको.** ( ३ ) जर नीट **पाहतास,** तर दिसलें असतें. ( ४ ) जर मनुष्य देवाप्रमाणें **वागता** तर देवच झाला असता. ( ५ ) नेहमीं चांगली संगति **घडावी.** ( ६ ) चांगलें वाक्य कानीं **पडावें.** ( ७ ) बुद्धि शुद्ध **व्हावी.** ( ८ ) वाईट मार्गाकडे मन **वळूं नये.** ( ९ ) खरें **बोल.** ( १० ) अध्ययन **सोडूं नको.** ( ११ ) आई-बापांना व अतिथीला देवाप्रमाणें **मान.** ( १२ ) मोरू **म्हणाला.** ( १३ ) माझ्याजवळ एक चित्र **आहे.** ( १४ ) तें मी तुला **देणार नाहीं.** ( १५ ) बी० ए० पर्यंत **शिकतास** तर बरें होतें.

६. क्रियापदाचा '**स्वार्थ**' केव्हां समजावा ?

---

# १७. प्रयोग

## [ १ ]

आपल्या बोलण्यांतील वाक्यांची रचना म्हणजे **प्रयोग** आपल्यास माहीत आहेत, त्यांच्या संबंधानें आज आपण थोडा जास्त विचार करूं.

खालील वाक्यांची जुळणी म्हणजे **प्रयोग** कोणते आहेत, पहा बरें !

| येथें कर्त्याप्रमाणें क्रियापद आहे, म्हणून— | येथें कर्माप्रमाणें क्रियापद आहे, म्हणून— |
|---|---|
| **[ हा कर्तरि-प्रयोग आहे. ]** | **[ हा कर्मणि-प्रयोग आहे. ]** |
| ( १ ) **रामा** आंबा खातो | ( १ ) **रामानें** आंबा खाल्ला |

| | |
|---|---|
| ( २ ) **मनी** आंबा खाते | ( २ ) **मनीनें** आंबा खाल्ला |
| ( ३ ) **मूल** आंबा खातें | ( ३ ) **मुलानें** आंबा खाल्ला |
| ( ४ ) **पांखरें** आंबा खातात | ( ४ ) **पांखरांनीं** आंबा खाल्ला |
| यांतील कर्ते कसे आहेत ? | यांतील कर्ते कसे आहेत ? |
| **कर्तरि-प्रयोगां**तील वाक्यांत— | **कर्मणि प्रयोगां**तील वाक्यांत— |
| ( १ ) '**रामा**' असा कर्ता आहे | (१) '**रामानें**' असा कर्ता आहे |
| ( २ ) '**मनी**' असा कर्ता आहे | (२) '**मनीनें**' असा कर्ता आहे |
| ( ३ ) '**मूल**' असा कर्ता आहे | (३) '**मुलानें**' असा कर्ता आहे |
| ( ४ ) '**पांखरें**' असा कर्ता आहे | (४) '**पांखरांनीं**' असा कर्ता आहे |

ह्यावरून कर्तरि-प्रयोगांत मूळ शब्द हाच कर्ता असतो; व कर्मणि-प्रयोगांत मूळ शब्द हा कधींच कर्ता असत नाहीं; तर रामा ह्याचें रामानें, मनी ह्याचें मनीनें, मूल ह्याचें मुलानें, पांखरें ह्याचें पांखरांनीं, अशा प्रकारचें कर्त्याचें रूप असावें लागतें; ही गोष्ट आपल्याला आढळून येते.

म्हणजे असें झालें कीं, आपल्यास कोणतेंही वाक्य कर्तरि-प्रयोगाचें हवें असेल, तर मूळ शब्द हाच कर्ता ठेवून, त्यास जमेल अशी क्रियापदाची जुळणी करावी; व कर्मणि-प्रयोगाचें हवें असेल, तर रामा ह्याचें रामानें, मनी ह्याचें मनीनें, असें रूप करून त्यास जमेल अशी क्रियापदाची जुळणी करावी; म्हणजे झालें. आपल्या बोल-ण्याच्या नेहमींच्या सरावावरून आपण एकदां कर्ता कायम केला कीं,

पुढील जुळणी आपल्यास सहज करितां येते; आपण चुकत नाहीं. पहा.

कर्ता मूळ शब्दच असला, तर—

| **[ आपण असें बोलतों ]** | **[ असें कधीं बोलत नाहीं ]** |
|---|---|
| ( १ ) रामा आंबा **खातो** | ( १ ) रामा आंबा '**खाल्ला**' |

किंवा खालीलप्रमाणें कर्ता असला तर—

| | |
|---|---|
| ( २ ) रामानें आंबा **खाल्ला** | ( २ ) रामानें आंबा '**खातो**' |

[ २ ]

आतां खालील ठिकाणीं कोणते प्रयोग आहेत व त्या वाक्यांतील कर्ते कशा प्रकारचे आहेत, पहा बरें ?

| | |
|---|---|
| येथें कर्माप्रमाणें क्रियापद फिरत आहे, म्हणून— | येथें कर्त्याप्रमाणें किंवा कर्माप्रमाणेंही क्रियापद फिरत नाहीं, म्हणून— |
| [ हा **कर्मणि-प्रयोग** आहे. ] | [ हा **भावे-प्रयोग** आहे. ] |
| ( १ ) **रामानें** रावण मारिला | ( १ ) **रामानें** रावणास मारिलें |
| ( २ ) **कृष्णानें** गाय बांधिली | ( २ ) **कृष्णानें** गाईस बांधिलें |
| ( ३ ) **शिपायानें** चोर धरिला | ( ३ ) **शिपायानें** चोरास धरिलें |
| येथें रामानें, कृष्णानें, शिपायानें, हे कर्ते आहेत. | येथेंही रामानें, कृष्णानें, शिपायानें, हेच कर्ते आहेत. |

**मग ह्या दोहोंत फरक काय आहे बरें ? कर्ते दोन्ही ठिकाणीं एकसारखेच आहेत, मग पहिल्या वाक्यांचा कर्मणि-प्रयोग कां ? व दुसऱ्या वाक्यांचा भावे-प्रयोग कां ? जर कर्त्यांमध्यें कांहीं फरक नाहीं तर कर्मांमध्यें कांहीं फरक आढळतो काय पहा बरें ?**

होय; येथें कर्मणि व भावे प्रयोगांत कर्ते रामानें, कृष्णानें, असे एकसारखेच दोहोंकडे दिसतात खरे; पण कर्म मात्र दोन्ही ठिकाणीं सारखें आढळत नाहीं; त्यांत बदल दिसत आहे.

| कर्मणि-प्रयोगांत— | भावे-प्रयोगांत— |
| --- | --- |
| **कर्मे मूळ शब्दच आहेत.** | **कर्मे मूळ शब्द नाहींत,** ते बदलले आहेत. |

ह्यावरून असें दिसतें कीं, कर्ता मूळ शब्द नसला, पण कर्म मात्र मूळ शब्द असलें तर कर्मणि-प्रयोग होतो; आणि कर्ताही मूळ शब्द नसला व कर्मही मूळ शब्द नसलें म्हणजे भावे-प्रयोग होतो.

आपल्यास कर्मणि किंवा भावे प्रयोगाचें वाक्य हवें असल्यास, रामानें, कृष्णानें, असे कर्ते घ्यावे; ते मूळ शब्द कधींही नसावेत; एवढें झाल्यावर कर्मणि-प्रयोग हवा असला, तर कर्म मात्र मूळ शब्द ठेवावें व त्याप्रमाणें क्रियापदाची जुळणी करावी; आणि भावे-प्रयोग हवा असल्यास, कर्म मूळ शब्द न ठेवतां, तें रावणास, गाईस, वासरास, असें करावें व क्रियापदाची जुळणी त्यास जमेल अशी करावी, म्हणजे झालें. नेहमींच्या सरावावरून ती जुळणी आपल्यास सहज करितां येते, हें आपण मागें पाहिलेंच आहे.

यावरून आपल्यास कोणत्याही वाक्याचा प्रयोग न चुकतां ओळखतां येईल व **कर्तरि, कर्मणि** अथवा **भावे** ह्यांपैकीं कोणत्याही प्रकारांत वाक्याची रचना करितां येईल. पहा—

**कर्तरि**—'गवळी' गाय किंवा गाईस बांधितो } ( कर्ता मूळ शब्द )

**कर्मणि**—गवळ्यानें 'गाय' बांधिली } ( कर्म मूळ शब्द; मूळ शब्द कर्ता नाहीं )

**भावे**—गवळ्यानें गाईस बांधलें } ( कर्ता—कर्म दोन्ही मूळ शब्द नाहींत )

   

आपणांस आज कोणत्या गोष्टी आढळून आल्या ?

**१. कर्तरि-प्रयोगांत मूळ शब्दच कर्ता असतो; व मूळ शब्दच कर्ता असला म्हणजे कर्तरि-प्रयोग होतो.**

**२. कर्मणि-प्रयोगांत कर्ता मूळ शब्द कधींच नसून, कर्म मात्र मूळ शब्दच असतें.**

**३. भावे-प्रयोगांत कर्ता, कर्म, दोन्ही मूळ शब्द नसतात; व हीं दोन्ही मूळ शब्द नसल्यासच भावे-प्रयोग होतो.**

---

## प्रश्न व गृहपाठ

१. **कर्तरि-प्रयोग** कोणत्या प्रकारचा कर्ता असल्यास होतो ?

२. **कर्मणि-प्रयोगांत** कर्ता व कर्म हीं कशा प्रकारचीं असतात ?

३. **भावे-प्रयोगांत** कर्ता—कर्म—क्रियापद हीं कशा प्रकारचीं असतात ?

४. खालील वाक्यांचे **प्रयोग** ओळखा व बाकीच्या दोन्ही प्रयोगांत तीं वाक्यें जुळवून धरून लिहून आणा :—

( १ ) पक्षी किडे खातात. ( २ ) मांजरानें उंदरास धरिलें. ( ३ ) शिक्षक विद्यार्थ्यांस शिकवितो. ( ४ ) गंगूनें कागद फाडिला. ( ५ ) मी लेखणी करितों. ( ६ ) मित्रानें फुलें दिलीं.

५. खालील वाक्यांतील कर्ता, कर्म, सांगून **प्रयोग** ओळखा:—

( १ ) राघोपंत बागेंत गेले. ( २ ) त्यांनीं पुष्कळ सुवासिक फुलें काढिलीं. ( ३ ) त्यांनीं तीं घरीं आणिलीं, ( ४ ) व देवास वाहिलीं.

(५) ते तिघे मुलगे बागेंतून फाटकाबाहेर आले. (६) तों त्यांना रखवालदारानें गांठलें. (७) आणि तिघांच्याही पाठीवर पांच–सहा शिपठ्या ओढिल्या. (८) तेव्हां नाना रखवालदारास म्हणाला. (९) तुम्हीं मला उगीच कां मारलें ?

(१०) दाशरथी राम हा बलाढ्य राजा होता. (११) त्याजवर सर्वांची भक्ति होती. (१२) दशरथानें त्याला राज्यावर बसविण्याचा निश्चय केला. (१३) तेव्हां कैकेयीच्या मनांत मत्सर उद्भवला. (१४) तिनें निराळाच बेत आरंभिला. (१५) तिनें दशरथास बोलावून आणिलें. (१६) व ती त्याला म्हणाली. (१७) मागें तुम्हीं मला वर दिले होते. (१८) तर रामाला राज्य न देतां भरताला द्या. (१९) त्यानें कैकेयीची खूप विनवणी केली. (२०) पण कैकेयी ऐकेना.

---

# १८. वाक्याचे दोन भाग–उद्देश्य व विधेय

## [ १ ]

आपण वाक्यां–वाक्यांनीं बोलतों; त्या वाक्यांत कोणत्या गोष्टी विशेषत: आढळून येतात बरें ?

आपण खालील वाक्यें पाहूं:—

| | | |
|---|---|---|
| (१) | रामा | धावतो |
| (२) | गंगू | येते |
| (३) | झाड | पडलें |
| (४) | वारा | वाहतो |
| (५) | मुलें | खेळतात |

यांतील पहिल्या वाक्यांत '**धावतो**' असें सांगितलें आहे. कोणाविषयीं 'धावतो' असें सांगितलें आहे ? ('**रामा** धावतो' म्हणून)

**रामाविषयीं;** हें उघडच आहे. त्याचप्रमाणें दुसऱ्या वाक्यांत '**येते**' असें सांगितलें आहे. कोणाविषयीं, कोणाला उद्देशून, 'येते' असें सांगितलें आहे? ('**गंगू** येते' म्हणून) **गंगूविषयीं;** हेंही स्पष्टच आहे. तिसऱ्या वाक्यांत '**पडलें**' असें सांगितलें आहे. कोणाविषयीं? ('**झाड** पडलें' म्हणून) **झाडाविषयीं** नाहीं का? त्याचप्रमाणें '**वाहतो**' असें चौथ्या वाक्यांत सांगितलें आहे, ('**वारा** वाहतो' म्हणून) तें **वाऱ्याविषयीं** सांगणें आहे; आणि '**खेळतात**' असें पांचव्या वाक्यांत सांगितलें आहे, ('**मुलें** खेळतात' म्हणून) तें **मुलांविषयीं** आहे; हें स्पष्टच आहे.

याप्रमाणें आपण जेव्हां जेव्हां एकादें वाक्य बोलतों तेव्हां तेव्हां '**कोणाविषयीं**' तरी बोलण्याचा आपला उद्देश असतोच; व मग त्याविषयीं आपणांस जें '**सांगणें**' तें आपण सांगतों. आपला कोणाविषयीं बोलण्याचा मुळीं हेतु किंवा उद्देशच नसेल, तर बोलणें व्हायचेंच नाहीं; अर्थात् वाक्य म्हटलें कीं, त्याचे हे दोन भाग असावयाचेच. (१) ज्याच्याविषयीं किंवा ज्याला उद्देशून आपण बोलतों तें; हा एक भाग. त्याला "**उद्देश्य**" असें आपण म्हणूं आणि (२) त्याबद्दल आपलें जें सांगणें तें; हा दुसरा भाग. त्याला 'सांगणें' म्हणजे 'विधान करणें' ह्यावरून "**विधेय**" असें म्हणूं.

म्हणजे वरच्या वाक्यांत अनुक्रमें रामा, गंगू, झाड, वारा, मुलें, ह्यांविषयीं, ह्यांच्यासंबंधानें, ह्यांना उद्देशून, आपणांस बोलावयाचें आहे, म्हणून तीं सर्व येथें त्या त्या वाक्यांतील **उद्देश्यें** आहेत; आणि

त्यांविषयीं धावतो, येते, पडलें, वाहतो, खेळतात, असें जें सांगितलें आहे, तीं सर्व त्या त्या वाक्यांतील **विधेयें** आहेत; असें म्हणावयास हरकत नाहीं.

[ २ ]

वरच्या सर्व वाक्यांत दोन-दोनच शब्द आहेत, ह्यामुळें त्या वाक्यांत "**कोणाविषयीं**" बोलणें आहे व त्याविषयीं काय 'बोलणें' म्हणजे "**विधान**" आहे, हें आपल्यास चट्कन कळत आहे. आतां दोहोंपेक्षां अधिक शब्दांच्या खालील वाक्यांत "**कोणाविषयीं**" बोलणें आहे व त्याविषयीं काय 'सांगणें' म्हणजे "**विधान**" आहे, तें ओळखा बरें ?

(१) रामा आंबे खातो } ह्या वाक्यांत 'खातो' असें सांगावयाचें आहे, हें स्पष्टच आहे; पण 'खातो' असें सांगणें किंवा विधान कोणाविषयीं आहे बरें? आपल्यास नीट विचार केल्यास कळून येईल कीं, 'खातो' असें बोलणें **रामाला** अनुलक्षून आहे; "**रामाविषयींच**" आहे.

परंतु रामाविषयीं नुसतें 'खातो' एवढेंच विधान येथें आहे काय? काय खातो हें येथें कळण्यास नको का? काय खातो हें सांगितलें नाहीं, तर सांगणें पूर्णपणें सांगितलें असें होईल का? 'माती खातो,' 'शेण खातो,' असा भलताच अर्थ कोणीं मानिल्यास चालेल का? अर्थात् 'खातो' असें म्हटल्याबरोबर नक्की काय खातो तें सांगितलेंच पाहिजे; म्हणजे जें सांगणें तें किंवा विधान पूर्ण होईल. अर्थात् येथें नुसतें 'खातो' असें विधान नसून,

" **आंबे खातो** " हें विधान आहे; एवढें सर्व सांगणें आहे; असें झालें.

त्याचप्रमाणें खालील वाक्य पहा—

( २ ) वाघानें गाय मारिली } ह्या ठिकाणीं 'मारिली' असें विधान आहे, हें उघडच आहे; पण तें विधान कोणाविषयीं आहे? विचार केला तर आपल्या ध्यानांत येईल कीं, वाघाला अनुलक्षून, वाघानें काय केलें, हें सांगण्यासाठीं म्हणजे " **वाघाविषयींच** " येथें बोलणें आहे.

परंतु वाघाविषयीं नुसतें 'मारिली' एवढेंच येथें सांगितलें आहे का? वरच्याप्रमाणेंच येथेंही काय मारिली हें कळण्यास नको का? काय मारिली हें सांगितलें नाहीं, तर सांगणें म्हणजे विधान पूर्णपणें कळेल का? अर्थात् 'मारिली' असें म्हटल्याबरोबर काय मारिली तें सांगणें प्राप्तच आहे; म्हणून ह्या वाक्यांत नुसतें 'मारिली' एवढेंच विधान नसून, " **गाय मारिली** " एवढें विधान आहे, म्हणजे एवढें सर्व सांगणें आहे; असें झालें.

( ३ ) मांजरानें उंदरास धरिलें. } ह्या वाक्यांत 'धरिलें' असें विधान आहे, व 'धरिलें' असें " **मांजराविषयींच** " बोलावयाचें आहे, हेंही उघडच आहे; पण नुसतें 'धरिलें' एवढेंच येथें सांगितलें आहे काय? काय धरिलें हें सांगितल्याशिवाय विधान पुरें होईल का? अर्थात् येथेंही नुसतें 'धरिलें' हें विधान नसून, " **उंदरास धरिलें** " एवढें विधान आहे; ह्या गोष्टी नीट विचार केल्यानें आपल्यास कळून येतील.

यावरून असें दिसतें कीं, वरच्या वाक्यांतून 'आंबे, गाय व उंद्-

रास' हीं जीं कर्मे आहेत, तीं उद्देश्याविषयीं जें काय सांगावयाचें तें पूर्ण करण्यासाठीं आलीं आहेत; म्हणून **कर्मे** हीं वाक्यांत बहुधा विधान पूर्ण करण्यासाठीं येतात; व कर्मासहित जें 'सांगणें' तेवढें **विधेय** होय; असें म्हणण्यास कांहीं हरकत दिसत नाहीं.

अर्थात् वरच्या वाक्यांत (१) रामा, वाघानें व मांजरानें हीं अनुक्रमें **उद्देश्यें** आहेत, आणि (२) "आंबे खातो," "गाय मारिली" व "उंदरास धरिलें," हीं **विधेयें** आहेत; असें झालें.

[अ] **उद्देश्य** हें नाम, सर्वनाम किंवा नामाप्रमाणें उपयोग केलेलें विशेषण असतें. उदा०—

**नाम—गोविंदा** बसला, **मनी** खेळते, **मुलें** उड्या मारितात.

**सर्वनाम—तो** जातो, **ती** पळाली, **त्यानें** डाव जिंकला.

**विशेषण—आंधळा** पडला, **शहाण्यानें** मूर्खाच्या नादीं लागूं नये.

[आ] **विधेय** हें क्रियापद असतें.

[ ३ ]

आतां, "माझी आई **बरी** झाली" ह्याबद्दल 'माझी आई झाली' असें म्हटल्यानें अर्थ पुरा होतो का ? तसेंच "विश्वामित्र **राजा** होता" येथें नुसतें 'विश्वामित्र होता' असें म्हटल्यानें आपल्यास हवा तो पूर्ण अर्थ कळतो का ? ह्या ठिकाणीं **बरी, राजा,** हे शब्द घातल्यावांचून जें सांगणें म्हणजे विधान करणें तें पूर्ण होतच नाहीं. आई कशी झाली तो शब्द तेथें अवश्य हवाच.

विश्वामित्र कोण होता तें सांगणारा शब्द हवाच. तरच विधान पूर्ण होतें; नाहींतर होत नाहीं. अर्थात् अशा शब्दांना विधानाची पूर्णता करणारे म्हणून " **विधानपूरक** " शब्द असें म्हणतात.

म्हणजे ज्याप्रमाणें **कर्म** हें विधेयांत येतें असें आपण वर पाहिलें, त्याचप्रमाणें **विधानपूरक** शब्दही विधेयांतच येतात; असें आतां दिसून आलें.

असणें, नसणें, होणें, वाटणें, भासणें वगैरे क्रियापदें अपूर्ण विधानार्थी असतात; त्यांना विधानपूरकाची केव्हां केव्हां गरज असते.

   

आज आपणांस काय समजलें ?

**१. वाक्याचे मुख्य भाग दोन; (१) उद्देश्य व (२) विधेय.**

**२. आपण ज्याविषयीं किंवा ज्याच्या उद्देशानें बोलतों तें उद्देश्य.**

**३. उद्देश्याविषयीं आपण जें सांगतों, म्हणजे विधान करितों तें विधेय.**

**४. " कर्म " हें विधेयांत येतें; त्याचप्रमाणें विधानपूरक शब्दही विधेयांतच येतात.**

---

## प्रश्न व गृहपाठ

१. **उद्देश्य** म्हणजे काय ? तें नांव कां पडलें असावें ?

२. **विधेय** म्हणजे काय ? तें नांव कां पडलें असावें ?

३. **कर्म** हें वाक्याच्या कोणत्या भागांत येतें ? कां ?

४. वाक्यांत उद्देश्यच नाहीं, असें कधीं होईल का ? कां ?

५. खालील वाक्यांतील **उद्देश्य** व **विधेय** हीं सांगाः—

( १ ) शिपाई चोर धरितो. ( २ ) आई मुलीला निजविते. ( ३ ) झाडें वाढतात. ( ४ ) वारे वाहतात. ( ५ ) बाबा येतील. ( ६ ) मुलें सोंगट्या

खेळणार नाहींत. ( ७ ) गोवाऱ्यानें गाईस बांधिलें. ( ८ ) मुलांनीं पुस्त्य लिहिल्या. ( ९ ) मुलींनीं रांगोळ्या घातल्या. ( १० ) गाय वासरास पाजिते.

६. बरा, राजा, राणी, शत्रु, मित्र, दुष्ट, कर्कशा, हे शब्द **विधानपूरक** होतील, अशा प्रकारें एकेक वाक्य घरून लिहून आणा.

---

## १९. उद्देश्य व विधेय यांची वाढ

### [ १ ]

वाक्य कांहीं ठराविकच शब्दांचें असतें, असें नाहीं; हव्या तेवढ्या शब्दांचें असूं शकतें, हें आपल्यास माहीतच आहे; तेव्हां ह्या वाक्यांतील "**उद्देश्य**" व "**विधेय**" हें कसें ओळखावें बरें ? तेंही ओळखणें सोपेंच आहे. उदाहरणार्थ, खालील वाक्यें पहा—

| **( १ ) गंगू** | **पडली.** |
| --- | --- |
| येथें 'गंगूविषयीं' बोलावयाचें आहे. | 'पडली' असें सांगावयाचें आहे. |
| **( २ ) देशमुखांची गंगू** | **आज पडली.** |
| येथें नुसत्या 'गंगू' विषयीं बोलावयाचें नसून "देशमुखांच्या गंगू" विषयीं बोलावयाचें आहे, हें उघडच आहे. | येथें नुसतें 'पडली' असें सांगावयाचें नसून, "आज पडली" असें सांगावयाचें आहे; हेंही उघडच आहे. |

**( ३ ) देशमुखांची मुलगी गंगू आज सकाळीं पडली.**

येथेंही नुसत्या 'गंगू' विषयीं बोलावयाचें नसून, "देशमुखांची मुलगी गंगू" हिच्याविषयीं बोलावयाचें आहे, हें स्पष्टच आहे.

येथेंही नुसतें 'पडली' असें सांगावयाचें नसून, "आज सकाळीं पडली" एवढें सांगावयाचें आहे, हेंही स्पष्टच आहे.

ह्यावरून ( १ ) कोणती गंगू, कोणाची गंगू, कशी गंगू, वगैरे शब्दांसहित ज्या गंगूविषयीं बोलावयाचें तें वरील वाक्यांतील **उद्देश्य** आहे; आणि ( २ ) केव्हां पडली, कोठें पडली, कशी पडली, वगैरे शब्दांसहित जें 'सांगणें' किंवा 'विधान' करणें तें वरील वाक्यांतील **विधेय** आहे; असें झालें.

[अ] **उद्देश्या**च्या मागें खालील प्रकारचे शब्द येऊन त्याची वाढ होते.

**षष्ठ्यंत शब्द—रामरावांचा** मुलगा गेला.

**विशेषण**—रामरावांचा **थोरला** मुलगा गेला.

**वाक्यांश—लोकांनीं पूज्य मानिलेले** गृहस्थ आज निजधामास गेले.

[आ] **विधेया**चे मागें पुढील शब्द येऊन विधेयाची वाढ होते.

**नामें**—इंग्रजी अभ्यास **बारा वर्षें** करावा लागतो.

**क्रियाविशेषणें**—तो **हळू** चालतो, मी **उद्यां** येईन.

**शब्दयोगी-अव्ययान्त शब्द—गेल्या वर्षापासून** तो आजारी आहे, तुम्ही **माझ्याबरोबर** या.

**वाक्यांश**—तो **चालतां चालतां** थकला, आम्ही **वाचीत बसलों असतां** मुली ओरडत होत्या.

[ २ ]

आतां **उद्देश्याचे** सगळे शब्द पहिल्यानें व **विधेयाचे** सगळे शब्द त्यांच्या मागून, असेंच वाक्यांत नेहमीं असतें काय, पहा बरें ?

( अ ) काल मी नाटकास गेलों होतों.

( आ ) मी काल नाटकास गेलों होतों.

( इ ) काल नाटकास गेलों होतों मी.

( ई ) गेलों होतों मी काल नाटकास.

अशा रीतीनें आपल्या बोलण्यांत शब्द हवे तसे येतात; ते कसेही आले, तरी त्यांचा वाक्यांत कोणाशीं संबंध आहे, हें कळणें महत्त्वाचें आहे; तें कळलें तरच बोलण्याचा खरा अर्थ कळला असें होईल; तें कळलें नाहीं, तर बोलणाराचें 'बोलणें' एक व ऐकणाराचें समजणें भलतेंच; असा प्रकार होईल. ह्यासाठीं वाक्यांतील "**उद्देश्य**" व "**विधेय**" हीं आपणांस हुडकून काढितां आलीं पाहिजेत.

खालील वाक्यें पहा:—

१. आकाशांत ढग आले. } ह्या वाक्यांत 'आकाशांत' ह्या शब्दाचा संबंध ढग ह्यांच्याशीं नाहीं. कोठें आले ? ("आकाशांत"), म्हणून त्या शब्दाचा संबंध 'आले' ह्याशीं आहे.

२. काळे कुट्ट ढग आकाशांत आले. } येथें 'काळेकुट्ट' ह्या शब्दांचा संबंध आकाशांत किंवा आले ह्यांच्याशीं नाहीं; काळेकुट्ट कोण ? ("ढग"), म्हणून 'ढग' ह्याच्याशीं आहे, हें उघडच आहे.

३. गारांच्या माऱ्यानें डोक्यास टेंगळें पडलीं } ह्या ठिकाणीं 'गारांच्या माऱ्यानें' व 'डोक्यास' ह्या शब्दांचा संबंध टेंगळें ह्याच्याशीं नाहीं; पडलीं कशानें ? ("गारांच्या माऱ्यानें"), पडलीं कोठें ? ("डोक्यास"), म्हणून ह्या शब्दांचा संबंध 'पडलीं' ह्याच्याशीं आहे.

ह्याप्रमाणें वाक्यांत पुष्कळ शब्द असले, तरी त्यांचा कोणाशीं काय संबंध आहे, हें विचार करून पहावें लागतें.

   

आज आपणांस कोणत्या गोष्टी कळल्या ?

**१. वाक्यांत अनेक शब्द येऊन, उद्देश्य व विधेय ह्यांची वाढ किंवा विस्तार होतो.**

**२. वाक्यांत शब्द नेहमीं ठराविक येतात, असें नाहीं.**

**३. शब्द कोठेंही असले, तरी त्यांचा कोणाशीं संबंध आहे, हें कळणें महत्त्वाचें आहे.**

---

## प्रश्न व गृहपाठ

१. **उद्देश्याचे** शब्द कां वाढतात ? २. **विधेयाचे** शब्द कां वाढतात ?

३. "घोडा पळाला" या वाक्यांतील **उद्देश्याचे** शब्द तीनपर्यंत वाढवून तीन वाक्यें धरून लिहून आणा.

४. "गाय हंबरते" यांतील **विधेयाचे** शब्द तीनपर्यंत वाढवून, धरून तीन वाक्यें लिहून आणा.

५. "काल सर्कशींत आम्हीं एक बंदूक मारणारा पोपट पाहिला" यांतील पहिल्या सहा शब्दांपैकीं प्रत्येकाचा संबंध कोणाशीं आहे व कशावरून त्याच्याशींच आहे, तें सांगा.

---

# २०. वाक्य–पृथक्करण

## [१]

वाक्यांतील शब्दांचा संबंध ध्यानांत घेऊन, त्यांतील "**उद्देश्य**" व "**विधेय**" कसें ओळखावें, हें आपण मागें पाहिलें; मुख्यत: ज्याविषयीं बोलावयाचें तें कसें आहे, कोणतें आहे, कोठलें आहे, कोणाचें आहे, इ० दाखविणाऱ्या शब्दांसहित एकंदर **उद्देश्य** होतें; व मुख्यत: जें विधान करावयाचें तें काय आहे, केव्हांचें आहे, कोठलें आहे, कसें आहे, इ० दाखविणाऱ्या शब्दांसहित एकंदर **विधेय** होतें; असें आपल्यास दिसून आलें.

म्हणजे एकंदर **उद्देश्या**मध्यें दोन पोटभाग पडतात, असें झालें. एक–ज्याविषयीं मुख्यत: बोलावयाचें तो प्रमुख शब्द, आपण त्याला मुख्य किंवा "**मूल उद्देश्य**" असें म्हणूं, व दुसरा–तें मूल उद्देश्य कसें आहे, इ० सांगणारे त्या मूल उद्देश्याला वाढविणारे शब्द, आपण त्यांना "**उद्देश्य–विस्तार**" असें म्हणूं, आणि या दोहोंला मिळून **उद्देश्यांग** म्हणूं.

एकंदर **विधेयाचे**ही खालीलप्रमाणें भाग असतात. एक—जें विधान करावयाचें तो मुख्य शब्द, त्याला आपण "**मूल विधेय**" असें म्हणूं. दुसरा—तें मूल विधेय कसें आहे इ० सांगणारे शब्द, त्यांना आपण "**विधेय—विस्तार**" असें म्हणूं. तिसरें—**कर्म,** हें विधेयांतच येतें, हें आपण मागें पाहिलेंच आहे; अर्थात् त्याचा एक भाग. तसेंच, "मुलगा **चांगलीं निवडक फळें** खातो" अशा वाक्यांतील **फळें** ह्या कर्माचीं 'चांगलीं' व 'निवडक' हे शब्द विशेषणें आहेत; म्हणून त्या शब्दांसहित **कर्म** हें एकंदर विधेयांत येतें; म्हणून त्या कर्माच्या विशेषणांचा **कर्मविस्तार** हा एक चौथा भाग, ह्याप्रमाणें भाग पडले.

ह्यांशिवाय **विधानपूरक** हाही एक पांचवा भाग विधेयांतच येतो, हें मागील पाठांत आपल्यास गेलेंच आहे.

तेव्हां मूळ विधेय व त्याचे वरील सर्व त्यास वाढविणारे व पूर्ण करणारे भाग या सर्वांस आपण "**विधेयांग**" असें म्हणूं.

म्हणजे वाक्यांतील शब्दांचा संबंध ओळखून, वाक्याचे मुख्य भाग व पोटभाग अगदीं स्पष्टपणें व स्वतंत्रपणें दाखवावयाचे असल्यास, आपल्यास **उद्देश्यांग** व **विधेयांग** असे दोन मुख्य भाग करावे लागतील; व **उद्देश्यांगा**मध्यें (१) मूल उद्देश्य व (२) उद्देश्य-विस्तार; आणि **विधेयांगा**मध्यें (१) मूल विधेय, (२) विधेय-विस्तार, (३) कर्म, (४) कर्मविस्तार, व (५) विधेयपूरक असे पांच भाग पाडिले पाहिजेत.*

---

* कर्म, कर्मविस्तार व विधेयपूरक हीं विधेयाला पूर्ण करणारींच असल्या-मुळें, मुलांना सोपें पडावें म्हणून कोणी ह्या तिहींमिळून एकच पोटभाग करितात.

[ २ ]

आतां वरीलप्रमाणें कांहीं वाक्यांतील **उद्देश्यें** आणि **विधेयें** व त्यांचे पोटभाग हीं निरनिराळीं म्हणजे पृथक् अशीं करून तीं आपण पद्धतशीर रीतीनें लिहून पाहूं या.

**१. "मेवाड देशांत राणा विक्रमाजिताचें राज्य होतें."**

| १. उद्देश्यांग. | | २. विधेयांग. | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| उद्देश्य-विस्तार | मूल उद्देश्य | कर्म-विस्तार | कर्म | विधेय-विस्तार | विधेय-पूरक | मूल विधेय |
| राणा विक्रमाजिताचें | राज्य | ... | ... | मेवाड देशांत | ... | होतें. |

**२. "त्याच्या सरदारांनीं त्याला ठार मारून त्याची गादी बळकाविली."**

| १. उद्देश्यांग. | | २. विधेयांग. | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| उद्देश्य-विस्तार | मूल उद्देश्य | कर्म-विस्तार | कर्म | विधेय-विस्तार | विधेय-पूरक | मूल विधेय |
| त्याच्या | सरदारांनीं | त्याची | गादी | त्याला ठार मारून, | ... | बळकाविली |

३. "तेव्हां त्याच्या लहान मुलाचा बचाव स्वामिभक्त पन्ना दाईनें आपल्या मुलास बळी देऊन केला."

| १. उद्देश्यांग. | | २. विधेयांग. | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| उद्देश्य-विस्तार | मूल उद्देश्य | कर्म-विस्तार | कर्म | विधेय-विस्तार | विधेय-पूरक | मूल विधेय |
| स्वामिभक्त | पन्नादाईनें | त्याच्या लहान मुलाचा | बचाव | आपल्या मुलास, बळी देऊन, तेव्हां, | ... | केला. |

[ ३ ]

आतां अशा रीतीनें प्रत्येक वाक्य निरनिराळें लिहिण्यापेक्षां आपण कांहीं वाक्यें एकत्रच लिहून, त्यांतील **उद्देश्यें** व **विधेयें** आणि त्या प्रत्येकाचे भाग हीं वरीलप्रमाणें पृथक् करून पाहूं या.

**वाक्यें.**

१. "दिवाळी आली."

२. "आमचा दादाही मुंबईहून एक्स्प्रेसनें आला."

३ "ताईनें संध्याकाळीं पानें मांडिलीं."

४. "तिनें उत्तम रांगोळ्या घातल्या होत्या."

५. "आम्हांला आवडणारे पदार्थ तिनें मुद्दाम तयार केले होते."

६. "आम्ही सर्व ताईला हारविण्यासाठीं एकदमच फराळास बसलों."

७. "इतक्यांत ताईचे यजमान वसंतरावही दाखल झाले."

८. "मग सर्वांनीं तिची थट्टा करकरून रडें येईपर्यंत तिला चिडविलें."

| १. उद्देश्यांग. | | | २. विधेयांग. | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| वाक्यें | उद्देश्य-विस्तार | मूल उद्देश्य | कर्म-विस्तार | कर्म | विधेय-विस्तार | विधेय-पूरक | मूल विधेय |
| १. | ... | दिवाळी | ... | ... | ... | ... | आली. |
| २. | आमचा | दादाही | ... | ... | एक्स्प्रेसनें, मुंबईहून, | ... | आला. |
| ३. | ... | ताईनें | ... | पानें | संध्याकाळीं | ... | मांडिलीं. |
| ४. | ... | तिनें | उत्तम | रांगोळ्या | ... | ... | घातल्या होत्या. |
| ५. | ... | तिनें | आम्हांला आवडणारे | पदार्थ | मुद्दाम, | तयार | केले होते. |
| ६. | सर्व | आम्हीं | ... | ... | ताईला हारविण्यासाठीं, एकदमच फराळास, | ... | बसलों. |
| ७. | ताईचे यजमान | वसंतरावही | ... | ... | इतक्यांत, | दाखल | झाले. |
| ८. | ... | सर्वांनीं | ... | तिला | तिची थट्टा करकरून, रडें येईपर्यंत, मग, | ... | चिडविलें. |

अशा रीतीनें वाक्यांतील शब्दांचा उद्देश्याशीं संबंध आहे, कीं विधेयाशीं संबंध आहे, तें ओळखून, कोणत्याही वाक्यांतील मुख्य **उद्देश्य व विधेय** आणि त्यांचे पोटभाग हीं वेगळीं म्हणजे पृथक् करून दाखविणें ह्याला " **वाक्य-पृथक्करण** " असें नांव आहे. वाक्यांतील शब्दांचा कोणाशीं कोणत्या प्रकारचा संबंध आहे हें कळणें कां अगत्याचें आहे, याचा विचार आपण पूर्वींच केला आहे. येथें तो संबंध ओळखून, वाक्याचे मुख्य दोन भाग—**उद्देश्य व विधेय**—आणि त्यांचे पोटभाग हीं व्यवस्थितपणें निरनिराळीं कशीं दाखवावयाचीं म्हणजेच " **वाक्य-पृथक्करण** " कसें लिहून दाखवावयाचें तें आपण वर पाहिलेंच आहे. हीच पृथक्करण लिहून दाखविण्याची रीत बरी दिसते; म्हणून आपण ह्यापुढें या रीतीप्रमाणेंच " **वाक्य-पृथक्करण** " लिहीत जाऊं या.

   

**आज आपण कोणत्या गोष्टीचा विचार केला ?**

**१. " वाक्य-पृथक्करण " कसें करावयाचें, तें ठरविलें.**

---

## प्रश्न व गृहपाठ

१. " **वाक्य-पृथक्करण** " म्हणजे काय ? तें कां आवश्यक आहे ?

२. " खालील वाक्यांतील **उद्देश्यें** व **विधेयें** आणि त्यांचे पोटभाग हीं निरनिराळीं पद्धतशीर रीतीनें लिहून दाखवा:—

( १ ) पश्चिम-हिंदुस्थानांत मुंबई हें आतिशय मोठें शहर आहे. ( २ ) इंग्लिश लोकांच्या हातीं हें बेट आल्यावर त्यांनीं त्याची कल्पनातीत अशी भरभराट केली.

(३) चांदबिबी ही शहाणी व शूर राणी पुढें फार दिवस वांचली नाहीं. (४) तिनें अहंमदनगर हातांतून जाऊं न देण्यांत पराकाष्ठेचें धैर्य व चातुर्य दाखविलें. (५) पण कांहीं आपमतलबी सरदारांच्या चिथावणीवरून, ह्या राणीला तिच्या स्वतःच्याच शिपायांनीं ठार मारिलें.

(६) एके दिवशीं सकाळीं फार धुकें पडलें होतें. (७) तेव्हां सूर्य पुष्कळ वर येऊनही दिसेना. (८) दादासाहेबांनीं आमचा उत्तम पाहुणचार केला. (९) इतका कीं, त्यामुळें अखेर आमची गाडी चुकली. (१०) आमची गाडी चुकावी, (११) अशी त्यांची इच्छा नव्हती. (१२) पण त्यांचा स्वभाव फार दिलदार होता. (१३) आपल्याकडे येऊन पाहुण्यांनीं तिंबूबुवांचें गाणें ऐकावें, (१४) म्हणून त्यांनीं पराकाष्ठा केली. (१५) जा; (१६) तिंबूबुवा सांपडतील (१७) तेथून त्याना घेऊन या, (१८) असे त्यांनीं आपल्या नोकरांस हुकूम सोडिले. (१९) मग वेळ जावा, (२०) म्हणून त्यांनीं तिंबूबुवांची हकीकत सांगण्यास आरंभ केला. (२१) आमचे तिंबूबुवा बंदेअल्लीकडे बारा वर्षें चिलीम भरण्यास होते. (२२) मग त्यांना गाणें आल्यावांचून कसें राहील? (२३) आतां गुरुजींप्रमाणें तेही थोडे तऱ्हेवाईक आहेत खरे. (२४) मनांत नसलें, (२५) तर 'आ' देखील करणार नाहींत; (२६) पण गावयास लागले कीं, (२७) आसपासच्या दऱ्या–खोऱ्यासुद्धां गर्जवून टाकतील.

---

## २१. शब्दांचें व्याकरण सांगणें

वाक्यांतील शब्दांचें व्याकरण कसें सांगावयाचें ती रीत मागील इयत्तेंतच आपल्यास माहीत झाली आहे. त्यापेक्षां ह्या इयत्तेंत ज्या कांहीं गोष्टींचा आपण अधिक विचार केला, त्याही गोष्टी आतां सांगितल्या पाहिजेत.

| | |
|---|---|
| **नाम**<br>**सर्वनाम** | मूळ शब्द, जात व पोटभेद, लिंग, विभक्ति, वचन व विभक्तीचा अर्थ. |
| **विशेषण** | कोणाचें विशेषण तें. |
| **क्रियापद** | मूळ धातु, सकर्मक कीं अकर्मक, अर्थ, काळ, लिंग, पुरुष, वचन व प्रयोग. |
| **अव्यय** | फक्त कोणत्या प्रकारचें तें नांव. |

आतां आपण कांहीं वाक्यें लिहून पाहूं.

१. **" रामभाऊनें एक विद्यार्थी रसायनशास्त्राच्या अभ्यासासाठीं नुकताच जपानास पाठविला."**

**रामभाऊनें**–हें रामभाऊ या विशेषनामाचें, पुल्लिंगी, तृतीयेचें एकवचन; तृतीयेचा अर्थ कर्ता, पाठविला ह्या क्रियापदाचा.

**एक**—हें विशेषण, विद्यार्थी ह्या शब्दाचें.

**विद्यार्थी**—हें विद्यार्थी या सामान्यनामाचें, पुल्लिंगी, प्रथमेचें एकवचन; प्रथमेचा अर्थ कर्म, पाठविला ह्या क्रियापदाचें.

**रसायनशास्त्राच्या**–हें रसायनशास्त्र या विशेषनामाचें, नपुंसकलिंगी, षष्ठीचें एकवचनी सामान्यरूप; षष्ठीचा अर्थ संबंध, अभ्यासासाठीं या शब्दाकडे.

**अभ्यासासाठीं**—हें अभ्यास या सामान्यनामाचें पुल्लिंगी, 'साठीं' ह्या शब्दयोगी अव्ययामुळें एकवचनी सामान्यरूप.

**साठीं**—हें शब्दयोगी अव्यय.

**नुकताच**—हें कालवाचक क्रियाविशेषण.

**जपानास**—हें जपान या विशेषनामाचें, नपुंसकलिंगी, चतुर्थीचें एकवचन; चतुर्थीचा अर्थ अधिकरण.

**पाठविला**—हें पाठव ह्या सकर्मक धातूचें, स्वार्थी, भूतकाळीं, पुल्लिंगी, तृतीय पुरुषाचें एकवचन.

ह्या वाक्यांत रामभाऊनें हा कर्ता, विद्यार्थी हें कर्म, पाठविला हें क्रियापद; हा **कर्मणिप्रयोग.**

२. **"दादोबा हे मराठीचे पहिले व्याकरणकार होते."**

**दादोबा**—हें दादोबा या विशेषनामाचें, पुल्लिंगी, प्रथमेचें (बहुमानार्थी) अनेकवचन.

**हे**—हें हा या दर्शक सर्वनामाचें, पुल्लिंगी, प्रथमेचें (बहुमानार्थी) अनेकवचन; प्रथमेचा अर्थ कर्ता, होते ह्या क्रियापदाचा.

**मराठीचे**—हें मराठी या विशेषनामाचें, स्त्रीलिंगी, षष्ठीचें एकवचन; षष्ठीचा अर्थ संबंध, व्याकरणकार ह्या शब्दाशीं.

**पहिले**—हें व्याकरणकार ह्या शब्दाचें विशेषण.

**व्याकरणकार**—हें व्याकरणकार या सामान्यनामाचें, पुल्लिंगी, प्रथमेचें (बहुमानार्थी) अनेकवचन.

**होते**—हें हो ह्या अकर्मक धातूचें, स्वार्थी, भूतकाळीं, पुल्लिंगी, तृतीय पुरुषाचें, (बहुमानार्थी) अनेकवचन.

ह्या वाक्यांत हे हा कर्ता, होते हें क्रियापद; हा **अकर्मककर्तरि प्रयोग.**

### ३. " लहानपणींच मुलांना चांगलें वळण लावावें. "

**लहानपणींच**—हें लहानपण या भाववाचकनामाचें, नपुंसकलिंगी, सप्तमीचें एकवचन; सप्तमीचा अर्थ अधिकरण.

**च**—हें शब्दयोगी अव्यय.

**मुलांना**—हें मूल या सामान्यनामाचें, नपुंसकलिंगी, चतुर्थीचें अनेकवचन; चतुर्थीचा अर्थ संप्रदान.

**चांगलें**—हें वळण ह्या शब्दाचें विशेषण.

**वळण**—हें वळण या सामान्यनामाचें, नपुंसकलिंगी, प्रथमेचें एकवचन; प्रथमेचा अर्थ कर्म, लावावें ह्या क्रियापदाचें.

**लावावें**—हें लाव ह्या सकर्मक धातूचें, विध्यर्थी, वर्तमानकाळीं, नपुंसकलिंगी, तृतीय पुरुषाचें एकवचन.

ह्या वाक्यांत आई-बापांनीं हा अध्याहृत कर्ता, वळण हें कर्म, लावावें हें क्रियापद; हा **कर्मणिप्रयोग.**

### ४. " तेव्हां रामरावानें त्याला फरफरां ओढीत चावडी-कडे नेलें "

**तेव्हां**—हें क्रियाविशेषण अव्यय.

**रामरावानें**—हें रामराव या विशेषनामाचें, पुल्लिंगी, तृतीयेचें एकवचन; तृतीयेचा अर्थ कर्ता, नेलें ह्या क्रियापदाचा.

**त्याला**—हें तो या तृतीय पुरुषवाचक सर्वनामाचें, पुल्लिंगी, द्वितीयेचें एकवचन; द्वितीयेचा अर्थ कर्म, नेलें ह्या क्रियापदाचें.

**फरफरां**—हें क्रियाविशेषण अव्यय.

**ओढीत**—हें क्रियाविशेषण अव्यय.

**चावडीकडे**—हें चावडी या सामान्यनामाचें, स्त्रीलिंगी, कडे ह्या शब्दयोगी अव्ययामुळें एकवचनी सामान्यरूप.

**कडे**—हें शब्दयोगी अव्यय.

**नेलें**—हें ने ह्या सकर्मक धातूचें, स्वार्थी, भूतकाळीं, नपुंसकलिंगी, तृतीय पुरुषाचें एकवचन.

ह्या वाक्यांत रामरावानें हा कर्ता, त्याला हें कर्म, नेलें हें क्रियापद; हा **सकर्मकभावे प्रयोग.**

---

## मॅकमिलनचीं शालोपयोगी पुस्तकें



---

Macmillan's Series of New Marathi Grammars. Book II.
By M. S. Mone, Price 4 Annas. 1932.